# DAKSHINA-PRIZE.

THE VOYAGES OF CAPTN COOK.

Translated from the Original

OF THE REVD WILLIAM BINGLEY

BY



Ganesh Sadáshiw Shástree Lele,

And Printed by

The Dakshina Prize Committee,

AT

The Poona College Press.

Poona

1855



# दक्षिणाप्रैज.

कप्तानकूकसाहेबयांचे जलपर्यटनाचा वृत्तांत
रेवरेंड विलियम विंगलीसाहेब यांनीं
इंग्रेजीभाषेंत केला आहे, त्यावरून
हाग्रंथ
सदाशिवगणेशशास्त्रीलेलेयांनीं
मराठीभाषेंत केला,
तो
दक्षिणाप्रैजकमीटीनें पसंत करून
पुणें पाठशाळे कडील छापखान्यांत
छापविला.

मुकामपुणें
छापणार नारोरामचंद्र ठकार स० छा०
इसवीसंन १८५३
शके १७७५

# कूकसाहेबाच्यावृत्तांताची अनुक्रमणिका.





# कपुतानकूक ह्याचा वृत्तांत.

## सूचना.

क्रिस्तफर कोलंबस ह्याच्या वेळापासून कपुतानकूक ह्याच्या वेळापर्यंत भिन्नभिन्न देशांत जे परमविख्यात असे जलपर्यटन करणारे होऊन गेले, त्यांच्या वृत्तांतावर संभाषण रूप ग्रंथ रेवरेंड विलियम बिङ्ग्लीसाहेब ह्यानें इंग्लिश भाषेंत रचिला आहे; त्या ग्रंथावरून कपुतानकूक त्याच्या वृत्तांताचें सांप्रत हें मराठींत भाषांतर केलें आहे. त्या ग्रंथांत संभाषण करणाऱ्यांचीं नांवें इंग्लिशरीतिचीं तीं बदलून त्यांच्या ठिकाणीं येथें मराठीरीतीचीं नांवें योजिलीं, तीं अशीं:—

| | |
|---|---|
| आनंदराव ——— | एक गृहस्थ. |
| रखमाबाई ——— | त्याची स्त्री. |
| गोपाळ व यमुना —— | त्यांचीं मुलें. |
| रामचंद्र —— | गोपाळाचा मित्र परंतु दुसऱ्या गांवीं राहणारा. |
| कृष्णाचार्य ——— | रामचंद्राचे गुरूजी. |

आनंदराव त्यांच्या बोलण्यावरून गोपाळा हा आपल्या गुरूजी बरोबर त्यांच्या गांवीं गेला होता, तेव्हां व्यर्थ काळक्षेप होऊंनये ह्मणून आनंदराव व कृष्णाचार्य ह्या उभयतांनीं चांगल्यारीतीनें काळ घालविण्याच्या अनेक योजना केल्या; त्यांत अशी एक योजना केली होती कीं, जे कोणी मोठे नामांकित पुरुष झाले त्यांपैकीं अनुक्रमें एकेकानें चरित

आणि गुण हे विषय रामचंद्र व गोपाळ ह्यांनीं दररोज लिहून तयार करावे, आणि संध्याकाळीं कांहीं काम नसतें तेव्हां ते वाचून त्यांवर सर्वांनीं संभाषण करावें. ह्या कामाकरितां ज्या ग्रंथांची गरज लागेल ते रामचंद्र व गोपाळा ह्यांनीं आनंदरावांच्या पुस्तकसंग्रहांतून घ्यावे. ह्याप्रमाणें, आनंदरावांच्या पुस्तकालयांत दररोज संध्याकाळीं मंडळी जमत असे, आणि तेथें रामचंद्र व गोपाळ हे नामांकित पुरुषांचा वृत्तांत लिहून तो वाचीत असत; अशा रीतीनें चवदा संध्याकाळ लोटले, त्यांत कोलंबसापासून तो कप्तान फिलिप ह्याजपर्यंत जे विख्यात पुरुष होऊन गेले त्यांचा वृत्तांत वाचून त्यावर संभाषणें झालीं. ह्यापुढें पंधराव्या संध्याकाळापासून कप्तान कूक ह्याच्या वृत्तांतावर संभाषण चालू झालें तें ह्या ग्रंथांत वर्णिलें आहे.



# पंधरावा संध्याकाळ.

ह्या संध्याकाळीं रामचंद्र ह्मणाला कीं, जलपर्यटन+ करणारा व देश सोधून काढणारा असा एक पुरुष झाला, त्याच्या वृत्तांताचा विषय काढून, मी व माझा मित्र गोपाळा हे, आह्मी उभयतां त्यावर संभाषण चालवावें अशा बेतांत आहों. त्यापुरुषाची बुद्धि, व त्यानें सिद्धीस नेलेलें कार्य, ह्यांची बरोबरी क्वचित् झाली असेल, परंतु त्यांवर कोणाची तोड कधींच झाली नाहीं. रखमाबाई बोलली कीं, कपतान जेम्सकूक ह्याशिवाय असा दुसरा कोणी दिसत नाहीं; कां कीं, त्या जातीचीं जितकीं कृत्यें आजपर्यंत प्रसिद्धीस आलीं आहेत, त्यासर्वांपेक्षां ह्यानें केलेल्या जलप्रवासाची फारच कीर्ति झाली. हा रखमाबाईचा तर्क बरोबर आहे असें त्यांनीं लागलेंच कबूल केलें; नंतर आनंदराव ह्मणाले कीं, दक्षिण समुद्रांत ज्या तीन मोहिमी केल्या, त्यांवर कपतान कूक ह्यास सरदार नेमिले होतें, व ज्यानें त्यास पाठविलें त्या ब्रिटिश सरकारचे मनोरथ त्यानें सर्वप्रकारें पूर्ण केले; ह्यावरून, त्यानें उत्तम विद्याभ्यास केला होता, असें दिसून येतें. गोपाळा बोलिला कीं, तशी कांहीं गोष्ट नव्हती; कारण त्याच्या बापाची इतकी गरीबी होती कीं, तो केवळ मोलमजुरी करून पोटभरीत असे; ह्मणून मुलग्यास तसा विद्याभ्यास करविण्याचें त्यास सामर्थ्य नव्हतें. रामचंद्र ह्मणाल

---

\+ परि ह्म० भोंवतें व अटन ह्म० फिरणें.

की, कपतान कूक ह्यास आठ भावांडें होतीं; यार्क शहराच्या उत्तरेस मार्टन ह्मणून एक खेडें आहे तेथें एक्या लहानशा झोंपडींत तो सन १७२८ चे अकटोबर महिन्यांत जन्मला, आणि त्या खेड्यांत एक पंतोजीण होती, तिनें त्यास वाचायास शिकविलें. त्यावर गोपाळानें ह्मटलें कीं अशी त्याची गोष्ट होती, परंतु त्याचा बाप पहिल्यानें जेथें राहात होता त्या जागेपासून थोडे मैलांचे अंतरावर एक शेत होतें, त्यावरील मुख्य चाकराचें काम त्यास मिळालें तेव्हां त्यानें जेम्स ह्यास शाळेंत घातलें; तेथें तो लिहिणें व अंकगणितांतील थोडेसे पहिले नेम शिकला.

रामचंद्र. — त्याचा हाही विद्याभ्यास फारदिवस चालला नाहीं; कारण अनेकप्रकारच्या शेतकीच्या कामांत त्यानें यथाप्रमाणें आपल्यास मदत करावी ह्मणून त्याचे बापानें पुढें लौकरच त्यास शाळेंतून काढिलें.

यमुना — तर मग त्यानें आपण समुद्रांत सफर करणारा व्हावें अशी मुळापासून योजना केली होती असें दिसत नाहीं.

गोपाळ — ती वार्ता ही नव्हती. उलटें तेरावर्षाचें वय झालें तेव्हां व्हिटबीचे उत्तरेस सुमारें दाहा मैलांवर स्टेथ्स् ह्मणून मासांच्या व्यापाराचें गांव आहे, तेथें किराणा जिन्नस विकणारापाशीं नोकरनामा लिहून देऊन तो चाकरीस राहिला.

रामचंद्र, — परंतु हा रोजगार त्याच्या मनास अगदीं बरा वाटला नाहीं; कांकीं दीडवर्षपर्यंत चाकरी झाल्यावर गलबतावर चाकरी धरण्याविषयीं त्याचे मनांत फार आवड उत्पन्न झाली; त्यावरून त्याच्या धन्यानें त्याच्या मर्जीप्रमाणें करण्याचा बेतकरून त्याचा करारनामा खुषीनें त्यास

परत दिला. ( ती जागा समुद्राचे नजीक होती, आणि लंडनशील्ड आणि संडरलंड ह्यांमधून जातां येतां जहाजें नेहमी दृष्टीस पडत, ह्या कारणामुळें बहुधा त्यास समुद्रावरची चाकरी करण्याची इच्छा झाली असेल. )

यमुना — ह्यानंतर त्याचें वर्तमान काय झालें?

रामचंद्र — व्हिटबी एथें राहाणारा वाकरसाहेब, ह्यापाशीं सातवर्षांचा करारनामा लिहून देऊन तो चाकरीस राहिला. वाकरसाहेब व दुसरा एक त्याचा सोबती, ह्यांउभयतांनी दोन गलबतें बाळगून कोळशांचा व्यापार चालविला होता. वाकरसाहेब ह्यास कूक ह्याच्या गुणांचें व बुद्धीचें यथार्थ ज्ञान झालें; आणि तीं दृढ होऊन वाढावीं ह्याविषयीं त्याच्यानें होईल तितका तो यत्न करूं लागला असें दिसून येतें.

आनंदराव — चांगला नाविक होण्यास जे गुण असावे, ते प्राप्त होण्याविषयीं कोळशाच्या व्यापारापेक्षां नाविककर्मापैकीं दुसरें कोणतें ही कर्म उत्तम नाहीं. दृढलक्ष्य, स्थिरनिश्चय, खंबीरपणा, एकसारखा दीर्घ प्रयत्न, हे गुण त्यास एथेंच प्राप्त झाले, असें बहुतांचें ह्मणणें आहे; ह्या गुणें करूनच त्याची प्रसिद्धि झाली. बरें रामचंद्रा तो वाकरसाहेबाच्या चाकरीस किती दिवस होता?

रामचंद्र — मुदत भरल्यावर ही कांहीं दिवस पर्यंत तो त्याचे चाकरीस होता. तदनंतर सन १७५५ चे उन्हाळ्यांत जेव्हां इंग्लिश आणि फ्रेंच ह्यांमध्यें लढायी उत्पन्न झाली, तेव्हां खलाशी लोकांस बिगारी धर-

ण्याची गर्दी चालू झाली, त्यासंधींत ज्या गलबताचे दिमतीस कूकसाहे व होता त्या गलबतासकट तो टेम्स नदींत होता. धरलें नजावें ह्मणून पहिल्यानें तो लपला, परंतु कितीही सावधगिरी ठेविली तरीं, नसांपडणें अथवा पाठलाग करणारांपासून निसटणें, हें दुर्घट होय; असा विचार करून, त्यानें आपले राजाची चाकरी स्वसंतोषें पतकारून पुढील दैवाची परीक्षा राजकीय आरमारांतच पाहावी असा निश्चय केला. आणि त्याप्रमाणें, वापिंग मुकामी सभा भरली होती तेथें जाऊन ईगल नाम आ ववार ह्या नामेंकरून ६० तोफांचें एक गलबत होतें, त्यावरील एक्या कामगाराच्या स्वाधीन झाला. सन १७५५ च्या अकटोबर महिन्यांत कपतान (पुढें सर्ह्यू) पालिसर ह्याची त्या गलबतावर नेमणूक झाली. जेव्हां त्यानें त्यागलबताचा अधिकार घेतला तेव्हां त्यानें त्यांत जेम्सकूक ह्यास पाहिलें; आणि हा दक्ष उद्योगी व तत्पर स्वलाशी आहे ह्मणून त्यानें त्यास लोकरच प्रसिद्धीस आणिलें. सर्व कामगारलोक त्याची स्तुती करूं लागले. आणि तो कपतान ही त्याची चालपाहून इतका खुष झाला कीं त्याचे आधीन होतें तितकें त्यानें त्यास उत्तेजन दिलें. उद्योगी आणि हुशार अशा स्वलाशाप्रमाणें त्यानें एकसारखी, व उत्तम, अशी वर्तणूक केली त्यामुळें सन १७५९ त त्यास मास्तरची जागा मिळाली; नंतर क्किबेक गांवाचा नाश करण्याविषयीं मदत करण्याकरितां तो मर्क्युरी नामक जाहाजांत बसून गेला. ह्यागांवा भोंवता वेढा दिला होता तो प्रसिद्ध आहे; त्या प्रसंगीं कूकसाहेबास जी कामगिरी सांगितली होती ती कठीण आणि प्राणसंकटाची होती ती अशी; सेंट

लारेन्स नामक नदीचा तपास करावा म्हणून त्यास हुकूम झाला. त्या नदीच्या कांहीं भागतर अगदीं फ्रेंन्च लोकांच्या लश्कराच्या तळासमोर होता. तथापि त्यानें तें काम अतिसूक्ष्मपणानें व अगदीं नचुकतां बरोबर रीतीनें बजाविलें.

कृष्णाचार्य — त्यानें त्यानदीचा नकाशा इतका बरोबर काढिला कीं, दुसऱ्यानें तपासणी करण्याच्या कामाची आजपर्यंत गरज पडलीच नाहीं. तथापि ह्यापूर्वी नकाशा काढण्याकरितां त्यानें कधीं लेखणी हातांत धरली नव्हती, ही गोष्ट सप्रमाण आहे. दीर्घ प्रयत्न आणि तीव्र बुद्धि ह्यांचे साहाय्यानें किती कठीण गोष्टी साध्य होतात हें कूक साहेबाच्या ह्या हकीकतीवरून आपल्यास दिसून येतें.

आनंदराव — ह्यानंतर दुसरे ठिकाणांची मोजणी करण्याचें काम त्यास सांगितलें त्यांत त्यास फायदा झाला.

गोपाळ — क्विबेक गांवाचा नाश केल्यावर कूकसाहेबास नार्थंबरलंडम्यान्‌आवबार ह्या नांवाच्या गलबतावरील मास्तरचें काम मिळालें त्या गलबतावर तो हिंवाळाभर हालिफाक्स मुकामीं राहिला.

कृष्णाचार्य — ह्यावेळीं सरकारचे मोठ्या उद्योगाचें काम त्याकडेस होतें असें दिसत नाहीं, तथापि त्यानें फुकट पोकळ असे कामांत काळ घालविला नाहीं.

गोपाळ — ती गोष्टतर बोलूंच नका महाराज, शास्त्राच्या ज्या शाखा शिकावयास पूर्वीं त्यास अनुकूल नव्हतें, त्यांचें ज्ञान संपादन कराव-

यास त्यास तेव्हां अवकाश मिळाला त्यानें यूक्लिडचें पुस्तक वाचिलें, व ज्योतिष आणि त्याचे रोजगाराच्या उपयोगी शास्त्राच्या शाखा, ह्यांचा तो झटून अभ्यास करूं लागला. त्यापाशीं पुस्तकें थोडींच होतीं, परंतु त्याच्या उद्योगाचे योगानें, त्याच्या अनेक न्यून गोष्टी होत्या त्या सिद्ध होऊन त्यास जितका अभ्यास करण्याची अनुकूळता होती ती पेक्षां त्याचा अभ्यास फार झाला.

आनंदराव —— ह्यानंतर कूकसाहेबाची नेमणूक, न्युफौंडलंड नामक उपयोगी बेट पुनः हस्तगत करून त्याची मोजणी करण्याकडेस झाली.

गोपाळा —— महाराज, अशी त्याची नेमणूक झाली, मग तो जेथें जेथें गेला व जें जें काम त्याकडेस सोंपलें, तेथें तेथें त्यानें तें तें आपलें काम बजावण्यामध्यें असें दृढ लक्ष्य पुरविलें कीं, ज्यासरदारांचे हाता खालीं त्यानें चाकरी केली त्यासर्वांनीं त्यास अगदीं खात्रीचीं अभूपत्रें दिलीं.

रामचंद्र —— न्युफौंडलंड बेटाची पाहाणी झाल्यावर न्युफौंडलंड व ल्याब्राडार ह्या बेटांच्या दर्याव पाहाणीचें काम ह्यास सांगीतलें. आणि काम चांगलें व्हावें ह्मणून त्याचे हाताखालीं एकास्कूनर* ची नेमणूक करून दिली. भूगोलाविषयीं ज्या ज्या गोष्टी ठाऊक नवत्या त्या त्या शोधून काढण्याविषयीं त्याची इच्छा होती त्यामुळें आपल्या हुद्याचें काम करून, हें ही करण्यास तो प्रवृत्त झाला. त्यानें जीं कामें हातीं धरलीं, तीं

---

* स्कूनर ह्मणून गलबताचा एक प्रकार आहे

अगदीं बरोबर केलीं; त्याप्रमाणेंच न्युफौंडलंड बेटाचे नकाशे स्वयंत्र काढिले इतकेंच नाहींतर त्या बेटाचे मध्यप्रदेश शोधून काढून पूर्वींपेक्षां त्याविषयांची विशेष माहितगिरी करून घेतली. त्यानें सन १७६७ पर्यंत चाकरी करून शेवटीं राजीनामा दिला आणि तो इंग्लंड देशास परत येता झाला.

रखमाबाई — ह्यानंतर थोडेच दिवसांनीं त्यानें पृथ्वी भोंवतें प्रथम जलपर्यटन करण्याचा उपक्रम केला असावा.

रामचंद्र — होय, सुमारें एक वर्ष झाल्यानंतर. वाली आणि कार्टरेट हे परत येण्याचे पूर्वी असें ठरलें कीं त्याच तऱ्हेचें दुसरें जलपर्यटन केलें पाहिजे.

यमुना — कशाकरितां बरें?

रामचंद्र — भूगोलविद्या व नौकाशास्त्र ह्याविषयींचें ज्ञान वाढावें ह्मणून. परंतु विशेषेंकरून खगोळशास्त्राची सुधारणूक व्हावी हाच मुख्य उद्देश होता. सन् १७६९ त, सूर्यबिंबावरून शुक्राचें संक्रमण होईल असा ज्योतिर्वेत्त्यांनीं सिद्धांत केला होता; त्याचा तपास करण्यास दक्षिण समुद्रांतील एकादे बेटांत गेलें असतां ठीक पडेल असें ठरलें होतें. ज्योतिषशास्त्राविषयीं हें काम फार अगत्याचें होतें ह्मणून इंग्लिश व दुसरे लोक ह्यांचें लक्ष्य तिकडेस लागलें पुढें रायलसोसैटी ह्यांनीं राजाकडेस ह्या विषयां अर्जी केली. तेव्हां सोसैटी ज्या विद्वानांची नेमणूक करील त्यांस दक्षिण समुद्रांत घेऊन जाण्याकरितां एक गलबत सरकारच्या खर्चानें पाठवावें असा हुकुम झाला. ह्या मोहिमीची सरदारी कूकसाहेबास

मिळाली. पूर्वी राजकीय आरमारांत लेवटेनेंटचे कामावर त्याची नेमणूक झाली होती. गोपाळानें त्याच्या जलप्रवासाचा सारांश तयार केला आहे, त्यापेक्षां त्या कार्याची सिद्धता कशी काय केली ह्याविषयींचा वृत्तांत आपण सांगावा असें त्याच्या मनांत असेल, ह्यांत भ्रांति नाहीं.

आनंदराव — गोपाळा, ह्याविषयींचें वृत्त तूं कृपाकरून आह्मास सांगशील?

गोपाळा — मी तो फार मनापासून सांगतों महाराज. कूकसाहेबानें आपल्यास पाहिजे तें गलबत निवडून घ्यावें असें ठरल्यावर त्यानें एंडेवर ह्यानांवाचें तीनशें सत्तरटन ओझ्याचें गलबत घेतलें, तें पूर्वी कोळशांच्या व्यापाराचें होतें. त्या जलप्रवासांचा उद्देश पूर्णतेनें सिद्धीस जावा ह्मणून बंदोबस्तानें सर्व सिद्धता केली. गलबतावर गाड्यावरच्या तोफा दहा, व जेजाला बारा होत्या; आणि लष्करी सरंजाम व दुसरें सामान ह्यांचा चांगला सांठा; तसेंच अठरामहिनें पर्यंत पुरे अशी अन्न सामग्री होती. कूकसाहेब खेरीज करून त्या गलबतावर चव्यायशीं मनुष्यें होतीं.

यमुना — कूकसाहेबा बरोबर जे विद्वान् गृहस्थ गेले होते त्यांचीं नांवें कोणतीं?

गोपाळा — जलप्रवास संबंधी जें ज्योतिषाचें काम पडेल त्याची चौकशी ठेवण्याकरितां कूकसाहेबा बरोबर, ग्रीनिच एथील वेधशाळेंतला मदतनीस चार्लसग्रीनसाहेब ह्यास नेमिलें; मिस्तर (हल्लीं सरजोसेफ) ब्यांकूस् आणि स्वीडन देशांत राहाणारा

डाकतर सोलेंडर ह्या नांवाचा प्रख्यात पदार्थ विज्ञानी ह्या उभयतांनीं सृष्टिज्ञानाची वृद्धि करण्याचें काम स्वीकारिलें.

आतां हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, शुक्राचें संक्रमण पाहाण्या करितांच हें जलपर्यटन करणार हा नियम आतां राहिला नाहीं; कारण पासिफिक समुद्राचा बराबर तपास करून त्याच्यानें होईल तितक्या यत्नानें पृथ्वीच्या त्या भागांतील प्रदेश सोधून काढावे, असा कूकसाहेबास हुकूम झाला.

## कूकसाहेबानें पृथ्वी सभोंवतें प्रथम जलपर्यटन केलें, त्याची गोष्ट.

सन १७६८ तील मे महिन्याच्या सत्ताविसाव्या तारिखेस लेफटेनेंट कूकसाहेब ह्यांस एंडेवर नामक जहाजाचें आधिपत्य मिळालें; तेव्हां त्यानें पुढील आगष्ट महिन्याच्या सव्वीसाव्या तारिखेस प्लीमौथ बंदराहून गलबत हाकारिलें. पहिल्यानें त्याचा मुकाम मदिराबेटांत झाला. इंग्लंड देशाहून निघाल्यापासून एथें येण्यास त्यास सुमारें १८ दिवस लागले. ह्या बेटांतून गोमांस, पाणी, व दारू त्यांचा आणखी सांठा घेऊन तो सप्तेंबरच्या १८ व्या तारिखेस रात्रीं पुढें चालता झाला; तो ब्रेझिल देशाचे किनाऱ्यावर रायोडीजानिरो ह्मणून एक शहर आहे तेथें जाऊन पोंचला. तेथें जाऊन, पाणी व दुसरा सरंजाम पैदा करावा असा त्याचा मुख्य उद्देश होता, त्याप्रमाणें ते पदार्थ गलबतावर भरून डिसेंबरच्या सातव्या तारिखेस त्यानें रायो एथून गलबत हाकारिलें.

ह्यावेळीं त्याचें गमन बहुधा दक्षिणाभिमुख होतें. दीड महिन्या

-च्या सुमारें तो लीमेर नामक सामुद्रधुनीच्या तोंडाशीं जाऊन ठेपला; आणि दुसऱ्या दिवशीं गुडसक्सेस नामक आखातांत त्यानें आपलें गलबत नांगरिलें. एंडेवर नामक जहाजाचा एथें मुकाम झाल्यावर ब्यांक्स साहेब व डाकतर सोलंडर आणि दुसरे दोघे गृहस्थ, हे ओझ्याकरितां दोन असामी खलाशी, व आपली गडी माणसें बरोबर घेऊन जाववेल तितकें मध्यदेशांत जाऊन रात्रीस पुनः परत यावें अशाविचारानें जमीनीवर उतरले, परंतु त्यांस वाटलें होतें त्यापेक्षां दूरत्व अधिक प्रत्ययास आलें, आणि दुर्गम अरण्यांतून चालणें व निबिड वृक्षांनीं व्याप्त अशा पंकिल प्रदेशाचें उल्लंघन करणें ह्या मध्यें त्यांस संकटें भोगावीं लागलीं, त्यामुळें त्यांचे गमनास इतका प्रतिबंध झाला कीं, सूर्योदयाच्या पूर्वी गलबतांजवळ जाणें अशक्य असें त्यांस दिसून आलें. ते बाहेर पडले तेव्हां मे महिन्यांतील निरभ्र दिवसा प्रमाणें रमणीय हवा होती, परंतु अवशीच्या रात्रीं ढग येऊन थंडी पडली, व एकाएकीं मोठा वारा सुटून त्या बरोबर बर्फ पडूं लागलें. डाकतर सोलंडर ह्यानें बहुत वेळां स्वीडन आणि नार्वे ह्यांचे मधील पर्वत वोलांडून अनुभव घेतला होता त्यावरून त्यानें आपल्या सोबत्यांची विनविणी केली कीं, थंडीच्या कडाख्यामुळें झोप येईल; परंतु कीतीही कष्ट पडले तरीं निजूं नका, निरंतर चालत असा. तो ह्मणाला कीं, "जो कोणी बसेल तो निजेल, व जो निजेल तो पुढें कधीं जागा होणार नाहीं" इतर बहुत शिक्षकां प्रमाणेंच आपल्या स्वतांच्या आचरणें करून आपला उपदेश ठसवून देण्याच्या कामांत ह्या डाकतरा पासून अंतर पडलें.

निजण्याविषयींची अनिवार इच्छा प्रथम त्यासच प्राप्त झाली. त्या काळीं ब्यांक्ससाहेब ह्यानें प्रथम त्याची प्रार्थना केली, पुढें, परिणाम वाईट होईल असें बजाविलें; व शेवटीं, निजूं नये ह्मणून त्यावर जबरी ही केली; तथापि तें सर्व व्यर्थ जाऊन तो आपल्या इच्छेच्या आधीन झाला. दैववशात् तेथें अग्नि पेटला होता, तेव्हां ब्यांक्ससाहेबानें त्यास जागें करून शेवटीं आपलें काम शेवटास नेलें. पांच मिनिटें (साडे बारा पळें) पर्यंत त्यास गाढ निद्रा लागली होती. इतक्या अल्प काळांत त्याच्या शरीराचे अवयव बहुधा लुले झाले होते. पाय, इतके आंखडून गेले होते कीं, त्याचे जोडे निघून पडले. खलाशां पैकीं एकजण व एक सिद्दी असे दोघे तर ठार मेले. पृथ्वीच्या त्या भागांत भर उन्हाळ्या मध्यें असें घडलें, ह्यावरून तेथील हवेचा कठीणपणा किती भयकारक आहे त्याची स्मारक ही गोष्ट झाली.

टीमरच्या सामुद्रधुनींतून जातांना लेफटेनेंट कूक व त्याचे सोबती ह्यांस जवळच्या देशांत राहाणाऱ्या लोकांची घळख करून घेण्याची संधी सांपडली. मनुष्याच्या स्वभावाची जी अत्यंत नीच अवस्था, ती त्यांनीं एथें पाहीली. सर्व मनुष्यांपेक्षां तेथील लोक अत्यंत निराश्रित, व पराकाष्ठेचे मंद असे दिसले. सभोंवतालच्या भयंकर अरण्यामध्यें इकडे तिकडे भ्रमण करण्यांत ते आपलीं आयुष्यें घालवीत. त्यांचीं घरें ह्मटली ह्मणजे केवळ गवत व काटक्या ह्यांच्या दरिद्री झोंपड्या होत्या. त्यांतून वारा तर काय पण पाऊस आणि बर्फ हीं देखील आंत येत. ते लोक बहूतकरून नग्न असत आणि अगदीं

अडाणी कल्पनेनें केलेला कोणताही उपयोगी जिन्नस त्यांजपाशीं नसे; इतका कीं, अन्न शिजण्या करितां एकादें पात्र देखील त्यांजवळ नसे. इतकें असूनही त्यांपाशीं होतें त्यापेक्षां अधिक प्राप्त व्हावें अशी त्यांस इच्छा होती असें ही दिसलें नाहीं.

केपहार्न ह्यास वळसा घालावयास लेफटेनेंटकूक ह्यास तेहतीस दिवस लागले. तो ज्या ज्या ठिकाणीं गेला त्या त्या ठिकाणचे अक्षांश व रेखांश त्यानें नक्की काढिले, व पुढें होणाऱ्या जलपर्यटन करणाऱ्यांस त्यानें सूचना लिहून ठेविल्या. ह्या दोन गोष्टीमुळें त्याच्या नौकागमनाच्या ह्या भागास फार मोठें उपयोग घडले.

जानेवारीच्या २६ व्या तारिखेस एंडेवर जहाज केपहार्न एथून निघालें तें एप्रिलच्या तेराव्या तारिखेस ओटेहीट बेटा जवळ जाऊन पोंचलें; आणि माटेवाई नामें आखातामध्यें त्याचा नांगर टाकिला. मार्गांत नवीन बेटें बहुत सांपडलीं त्यांस लगूनबेट, थ्रम्यू क्याप, बोबेट, दिग्रूप्स, बर्ड आणि चेनबेट, ह्या प्रमाणें नावें दिलीं. त्यांपैकीं बहुतेकांत मनुष्यांची वस्ती होती असें दिसलें; आणि ज्यांच्या दृष्टीस, आलीकडे टेराडेलफ्यूगो एथील भयंकर पर्वत, आभाळ, व पाणी, ह्यां खेरीज दुसरें कांहींच पडलें नव्हतें त्यांनीं जेव्हां कित्येक बेटांवर ताडांची झाडी व निळवटही पाहिली तेव्हांनीं त्यांस भूस्वर्गा प्रमाणें दिसलीं.

ओटेहीट बेटांत इंग्लिशांचा मुकाम कांहींकाळपर्यंत बहुधा होईल, आणि तो तेथील राहाणाऱ्यां बराबर ज्या रीतीनें व्यापार चालेल त्या धोरणा-

नेंच होईल असें जाणून लेफटेनेंट कूक ह्यानें, आपल्या लोकांनीं कसें वागावें ह्याविषयीं मोठ्या चतुराईनें व दयाळूपणानें कितीएक कायदे करून त्यां बर्हुकूम वर्तावें अशी त्यांस सक्त ताकीद केली.

एथें आल्यावर, आपलें मुख्य कार्य सिद्धीस नेण्याची तयारी करण्याकडेस पहिल्यानें त्याचें लक्ष्य लागलें, ह्याकरितां तो किनाऱ्यावर गेला आणि तेथें राहाणाऱ्यांच्या घरांपासून दूर व जहाजावरील तोफांचा मारा जेथें पोंचेल, अशी एक जागा त्यानें शोधून काढिली. त्याजागेवरल ह्यानसातट बांधून त्यावर त्यानें साहा जेजाला चढविल्या, आणि ग्रहवेध करण्याकरितां सर्वसिद्धता केली. हीं कृत्यें पाहून तेथील लोकांस कांहींशी चिंता प्राप्त झाली; परंतु ह्या तटाच्या आंतील जागा कांहींकाळपर्यंत ठेवून सोडिली जाईल अशी खुणारवाणा करून जेव्हां त्यांची खात्री केली तेव्हां ते स्वस्थ झाले. तेथील लोकांच्या माल मत्तेवर जुलूम नव्हावा ह्मणून कूकसाहेब इतका जपत असे कीं तटबांधावयास जितके खांब लागले तितके त्यानें विकत घेतले; तसेंच प्रथम गांवकऱ्यांचें संमत घेतल्या शिवाय त्यानें एकही झाड तोडिलें नाहीं.

वर सांगितलेल्या कामाचा कारखाना चालला असतां, कूकसाहेबानें त्यावर तेरा असामी आरमारी लोक, व एक मिड्शिपम्यान् पदवीचा कामदार, असे रक्षणार्थ ठेविले, आणि बरोबर आलेल्या गृहस्थांस समागमें घेऊन, त्यादेशांतील रानांत एक लहानशी सफर करावी ह्या बेतानें तो निघाला. तो फारसा दूर गेला नाहीं, इतक्यांत एक वाईट गोष्ट घडली तिजमुळें त्यांस परत यावें लागलें. तीगोष्ट अशी, कूकसाहेब

मित्रांसहवर्तमान गेला त्यावेळीं एक **इंडियन** मनुष्य त्यांचे तंबूच्या आसपास होता, त्यानें तेथील संत्री बेसावध आहे अशी संधीपाहून, त्याची बंदूक हिसकून घेतली. त्याकाळीं **मिडशिपम्यान** ह्यानें शिपायांस बार झाडावयाचा हुकूम दिला. तेव्हां शेंभरांहून अधिक मनुष्यें गोळा झालीं होतीं, त्यांवर त्यांनीं निर्दयपणें बदुकांचा मार चालविला; तथापि दैवयोगानें कोणा एकास जखम देखील लागली नाहीं. परंतु पुढें त्या चोराचा पाठलाग करून त्यास गोळीघालून ठार केलें. त्या कामदाराच्या ह्या वर्तणुकीवरून **कूकसाहेबास** असंतोष उत्पन्न झाला; व **इंडियन्** लोकांची धास्ती दूरकरून त्यांचा भरंवसा पुनः आपणावर बसण्याविषयीं. त्यानें होईल तितका यत्न केला, आणि तें काम त्यानें मोठ्या आयासानें सिद्धीस नेलें.

पुढें लोकरच एक प्रसंग घडला; त्यांत त्यानें आपली न्यायाविषयींची भक्ति व तेथीललोकांस उपद्रव नव्हावा ह्याविषयींची काळजी ह्यांचा चमत्कारिक दाखला दाखविला. तो असा; **ओटेहीट** बेटांतील एक्या **नायकाच्या** बायकोजवळ पाषाणाची एक फरशी होती, ती **एंडेवर** जहाजावरील **खाटिकानें** मागीतली, आणि तिजबद्दल त्या बाईला एक खिळा देऊं लागला. त्यास ती कबूल होईना; तेव्हां त्यानें खिळा खालीं टाकून ती फरशी उचलून घेतली; आणि तीस भय घातलें कीं, जर तूं कांहीं गडबड करशील तर तुला ठार मारून टाकीनाही गोष्ट **कूकसाहेबाचे** कानावर घातली आणि तो गुन्हा त्या खाटिकावर शाबीत झाला. पुढें थोडेच दिवसांनीं तो **नाईक** आपल्या

बायका व दुसरे गांवकरी, ह्यांसहवर्तमान जहाजावर आला. तेव्हां कूक साहेबानें अपराध्यास त्यांचे पुढें आणिलें; आणि गुन्हा व त्याची शाबिती, ह्यांविषयींचा मजकूर मोठ्यानें बोलून, गुन्हेगारास त्याक्षणीं शिक्षा करावी ह्मणून हुकूम केला. जेव्हां त्यास उघडें करून जहाजाच्या चव्हांटावी बांधून टाकिलें, तेव्हां इंडियन लोकांचें लक्ष्य अगदीं तिकडे लागून आतां काय होतें तें पाहाण्याविषयीं ते तटस्थ झाले. परंतु त्यास एक फटका बसतांच, बाकीची शिक्षा ह्यास माफ करावी ह्मणून त्यांनीं फार विनवणी केली; आणि आपली रदबदली चालत नाहीं, असें त्यांस समजलें तेव्हां, त्यांच्या नेत्रांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या.

ग्रहवेध करण्याचीं यंत्रें कांठावर आणिलीं, तेव्हां मोठें वजनदार असें सूर्ययंत्र पूर्वीं पेटाऱ्यांतून काढिलें नव्हतें, त्यापाशीं थोड्या हातांच्या अंतरावर संत्री उभा केला असतांही, तें चोरीस गेलें; परंतु शाहाणपणानें व खबरदारीनें प्रयत्न केल्यामुळें तें पुनः हस्तगत झालें. ही गोष्ट मोठ्या अगत्याची झाली; कारण, ह्या यंत्रावांचून त्या जलपर्यटनाचा मुख्य उद्देश शेवटास गेला नसता.

कांहीं दिवसपर्यंत, मणी व दुसरे हलके पदार्थ ह्यांबद्दल सर्व तऱ्हांचे खायाचे पदार्थ मिळत होते, परंतु त्या व्यापाराची अगदीं मंदी पडल्यावरून, मे महिन्याच्या आठव्या तारिखेस सफर करणाऱ्यांस खिळे बाहेर काढण्याचें पहिल्यानेंच प्राप्त झालें; त्या पदार्थापासून असा गुण झाला कीं, चार इंच लांबीचा खिळा दिला ह्मणजे त्याबद्दल वीस नारळ, व ह्याच प्रमाणानें ब्रेडफ्रुट ह्मणून फळें, अशीं मिळूं लागलीं.

जलपर्यटनाचा मुख्य उद्देश, सिद्ध करण्याचा दिवस जवळ आला असें पाहून **लेफटेनेंट कूक** ह्यानें वेगळाल्या ठिकाणाहून **शुक्राच्या** संक्रमणाचें अवलोकन करावया करितां, दोन टोळ्या पाठवावयाचा बेत केला, आणि त्याप्रमाणें **गोरसाहेब** व दुसरे गृहस्थ, ह्यांजबराबर यथास्थित यंत्रें देऊन जवळच एक **एमीओ** ह्या नांवाचें बेट होतें, तेथें पाठविलें. तसेंच, **हिचसाहेब** व दुसरे ह्यांस मुख्य ठिकाणापासून पूर्वेकडेस **ओटेहीट** बेटामध्येंच एक सोयवार जागा होती तेथें पाठविलें. ज्यून महिन्याच्या तिसऱ्या तारिखेस वेध करावयाचा होता. त्या दिवशीं हवा चांगली होती, सूर्योदय झाला तेव्हां अगदीं अभ्रें नव्हतीं आणि सर्व दिवसभर लखलखीत ऊन पडलें होतें, त्यामुळें चोहींकडून वेध करितां आला. त्या वेधस्थलाचे सत्रा अंश एकुणतीस कळा व पंधरा विकळा इतके अक्षांश, व एकशें एकुणपन्नास अंश बत्तीस कळा व तीस विकळा इतके **ग्रीनीच** पासून पश्चिमेस रेखांश होते.

ह्या प्रमाणें जलपर्यटनाचा पहिला मुख्य उद्देश सिद्धीस गेल्यामुळें **लेफटेनेंट कूक** व त्याचे मित्र ह्यांस आनंद झाला, परंतु जहाजावरील मंडळी पैकीं कितीएकांच्या वर्तणुकीमुळें तो आनंद फार कमी झाला. तो प्रकार असा, मुख्य कामगाराचें चित्त **शुक्राच्या** संक्रमणांत अगदीं गढून गेलें असतां वरालिहिल्या मंडळीनें एक्या कोठीच्या खोलींत शिरून मोठाले खिळे पुष्कळ चोरून नेले. ही उघड व नाशकारक अशी गोष्ट घडली. कारण, जर ते खिळे कळेल तशा अव्यवस्थितपणें **इंडियन** लोकांमध्यें वांटिले असते, तर तेणें करून त्यांच्या व्यापाराचा सु-

ख्य जिन्नस जें लोंखंड, त्याची किंमत उतरून इंग्लिशलोकांचा तोटा झाला असता, तो सुधारावयास आला नसता, चोरांतून एक असामी पकडला, त्यापाशीं सात खिळे मात्र सांपडले. त्या चोरास चोवीस फटके मारून शिक्षा केली, तथापि त्यानें आपल्या साग्यालाग्यां पैकीं एकासही दाखवून दिलें नाहीं.

नौकागमनाचें ज्ञान वाढवावें आणि नवेनवे शोध लावावे ह्यागोष्टी लेफटनेंट कूक ह्याचे मनांत निरंतर होत्या, ह्मणून तो लहानशा नावेंत बसून ब्यांक्स साहेबा सहवर्तमान त्या बेटा सभोंवती प्रदक्षिणा करण्याकरितां ज्यून महिन्याच्या २६व्या तारिखेस निघाला. ह्या फेरीकरण्यामुळें, ओटेहीट बेटाचे किती एक परगणे, व त्यांवरील तद्देशीय अधिकारी, व तेथील लोकांच्या री भाती, ह्याविषयींच्या अनेक प्रकारच्या चमत्कारिक गोष्टी, ह्यांची त्यांस माहिती झाली. त्या बेटाचा घेरा सरासरी ९० मैल भरला. अशी ती प्रदक्षिणा करून तो माटेबी एथील किल्यास जुलैच्या पहिल्या तारिखेस परत आला.

ओटेहीट बेटा सभोंवती प्रदक्षिणा झाल्यावर ज्या नदीजवळ जहाज नांगरिलें होतें तीजेथून निघाली त्या खिंडीपर्यंत तिचा शोध लावून तिच्या कांठावर कोठपर्यंत वस्ती आहे ह्याचा तपास करण्याकरितां ब्यांक्स साहेबानें एक स्वारी केली. त्या स्वारींत ब्यांक्स ह्यानें पृथ्वीच्या पोटांतील अग्नीची बहुत चिन्हें पाहिलीं. दगड जळाल्याच्या खुणा स्पष्ट दिसत होत्या, व डोंगरावरील माती ही त्यांच्या माखिीच दिसून आली.

ब्यांक्स साहेबानें दुसरा एक अमोलिक उद्योग केला; तो असा की, फलिंगडें, नारिंगें, निंबें वगरची झाडें, ह्यांचें बी रायोडीजानिरो येथें गोळा केलें होतें, तें ह्या ठिकाणीं पुष्कळ पेरून दिलें. त्याकरितां त्यानें किल्याच्या प्रत्येक बाजूस जागा तयार करून तेथें जितक्या तऱ्हांची जमीन आढळली तितक्या तऱ्हा निवडून काढिल्या. त्या बियां पैकीं बी तद्देशीय लोकांस सढळ हातानें देऊन तेथील रानांतही त्यानें पुष्कळ लाविलें.

ह्या बेटांत कमकसर तीन महिने पर्यंत मुकाम झाल्यावर लेफ्टनेंट कूक हा शेवटीं तेथून निघण्याची तयारी करूं लागला. आपल्यान किंवा तद्देशीयलोकांस आणखी उपद्रव झाल्या वांचून आपण येथून जाऊं अशी त्यास आशा होती, पण ती व्यर्थ झाली. तो प्रकार असा, जहाजावरील शिबंदी पैकीं दोन असामी नपुसतां किल्ला सोडून गेले, आणि त्या बेटांतच राहावें ह्या बुद्धीनें त्यांनीं ओटेहीट बेटांतील बायकां बराबर लग्न केलें. त्या मनुष्यांस परत आणणें फार जरूर होतें, ह्याजकरितां तो मजकूर, किल्यामध्यें कित्तीएक तद्देशीय अम्मलदार आपल्या बायकां सुद्धां आले होते, त्यां बराबर ओबरीआ नामें राणी ही आली होती, त्या सर्वांस कळवून सांगीतलें कीं, आमचे पळून गेलेले मनुष्य हस्तगत होतील तों पर्यंत तुह्मांस आपल्या घरीं परत जाऊं देणार नाहीं. कांहीं शी मेहेनत पुरवल्यावर ही हिकमत सिद्धीस गेली. नंतर गलबतावरील शिपाई परत मिळाल्यावर तद्देशीय अधिकारी ह्यांची प्रतिबंधापासून सुटका झाली.

ओबरीआ राणीच्या भर अमलांत ट्यूपिआ नामें मुख्य

प्रधान होता, तोच त्या देशांतील मुख्य उपाध्याय होता, त्यानें इंग्रेज लोक त्या बेटांत होते तेव्हां त्यांशीं फार स्नेहानें वर्तणूक केली. त्यांबरोबर तेथून जाण्याची इच्छा त्यानें वारंवार दर्शविली होती. व जेव्हां ते जावयास निघाले तेव्हां, बरोबर तेरावर्षांचा एक मुलगा घेऊन तो जहाजावर आला. आणि तुमच्या बरोबर जलपर्यटन करावयास मलाही परवानगी असावी, म्हणून विनंती करूं लागला. अनेक कारणां मुळें असा एखादा मनुष्य एंडेवर जहाजावर असावा हें जरूर होतें, याजकारितां लेफटेनेंट कूक ह्यानें त्याचें बोलणें संतोषानें मान्य केलें.

ज्यूलैच्या तेराव्या तारिखेस इंग्लिशलोकांनीं नांगर वर ओढून गलबत हाकारिलें. तेव्हां ट्यूपिआ व त्याचा मुलगा हे खेरीज करून, इंडियनलोकांनीं अत्यंत खेदयुक्त होऊन त्याचा निरोप घेतला. त्या शोककारक समयीं त्यानें आपल्यास तत्परतेनें व निश्चयानें आवरून धरिलें, परंतु मित्रांच्या वियोगकालीं जें दुःख मनुष्यास व्हावें, आणि जें त्यांस खरोखर भूषणरूपच होतें तें त्याला झालें.

कूकसाहेब जेथें जेथें गेला, व जे जे देश त्यानें शोधून काढिले, त्या त्या देशांचें स्वरूप, उपज, [illegible]ज, तेथील राहाणारे, व त्यांच्या रीती भाती, ह्यांचें वर्तमान, किंवा नौकागमनविद्या, भूगोलविद्या, व खगोलविद्या ह्यांविषयींचे जे त्यानें शोध केले, त्यांचा सविस्तर वृत्तांत, हें सर्व सांगूं गेलों तर, तें आपल्या कथा सांगण्याच्या बेताबाहेर जाईल. म्हणून येथें इतकेंच सांगणें पुरे कीं, ज्ञानाची वृद्धि व्हावी, आणि नौकागमनास उपयोग व्हावा ह्याजकरितां, वृत्तांताचा उपयोग सं-

ग्रह केल्याशिवाय ओटेहीट बेटाहून तो नौकाध्यक्ष निघाला नाहीं.

एंडेवर जहाज स्वस्थपणें चालत असतां, ट्यूपिआ ह्यानें लेफटेनेंटकूक ह्यास समजाविलें कीं, डुकरें, कोंबडीं, व दुसरे खावयाचे पदार्थ, जे ओटेहीट ऐथें थोडे मिळाले ते आसपासच्या बेटांपैकीं ह्यूआहीनी, युलीटिआ, ओटेहा आणि बोलाबोला ह्या चार बेटांत पुष्कळ पैदा होतील. ह्या बेटांपैकीं पहिलीं दोन बेटें, ओटेहीट बेटा एवढीं मोठीं असून, त्यांमध्यें वस्तीही बरीच आहे असें त्यानें सांगीतलें.

ज्यूलैच्या सोळाव्या तारिखेस एंडेवर जहाज ह्यूआहीनी बेटाच्या वायव्य भागाच्या जवळ गेलें. तेव्हां त्याजवळ किती एक होड्या आल्या. त्यांतून एक्या होडींत त्या बेटाचा राजा व राणी हीं उभयतां आलीं होतीं. त्या होड्यांतील लोक प्रथम भ्यालेसे दिसले, परंतु त्यांनीं जेव्हां ट्यूपिआ ह्यास पाहिलें, तेव्हां त्यांचें भय कांहींसें कमी झालें. व शेवटीं राजा राणी व दुसरे किती एक जण हे धीर करून जहाजावर आले. तेथें जें जें त्यांस दाखविलें तें तें पाहून ते फार आश्चर्य करूं लागले. जेव्हां त्यांची ह्यांची आणखी घसवट पडली, तेव्हां कूकसाहेबास समजलें कीं, त्या राजाचें नांव ओरी होतें, आणि त्याच्या मनांत मित्रत्वाची खूण असें समजून परस्परांच्या नांवांची अदलाबदल करावी असें होतें. ह्या गोष्टीस कूकसाहेबानें तावडतोब रुकार दिला. आणि जों पर्यंत ते दोघे एकत्र होते तों पर्यंत कूकसाहेब ओरी हें

पावला, व **ओरीराजा कूक** हें नांव पावला. त्या बेटाच्या पश्चिमे कडील बाजूस एक लहानसें बंदर होतें, तेथें तिसरे प्रहरीं **एंडेवर** जहाज नांगरिलें.

**कूकसाहेबानें** दुसऱ्या गृहस्थांसहवर्तमान ह्या बेटामध्यें तीन चार फेऱ्या केल्या, त्यावरून तेथील राहाणारे बहुधा **ओटेहीट** येथील लोकांप्रमाणेंच आहेत व उपजानिपज तर येथली व तेथली एकच आहे असें समजण्यांत आलें. व्यापाराचे जिनसांची अदलाबदल करण्यांत ते सावधपणा व विलंब करीत, ह्यामुळें त्यांजबराबर व्यापार फार मंद व धिमा चालूं लागला. तेथून जहाज हाकारिते वेळेस **कूक साहेबानें** अनेकपदार्थ राजास नजर केले, त्यांमध्यें जस्ताचा एक लहानसा पत्रा होता त्यावर हे शब्द कोरिले होते. "ब्रिटिश राजाचें जहाज नामें **एंडेवर**, मालिम **लेफटेनेंट जेम्सकूक**, तारिख १८वी माहे ज्युलै इसवी सन १७६९ मुकाम **हूहाहीनी बेट**." त्यास असें वाटलें, कीं, ह्या बेटाचा शोध प्रथम इंग्लिशलोकांनीं लाविला, ह्याविषयींचें स्मरण येणें करून फार दिवस राहील.

तेथून **युलीटिआ** बेटास जाण्याकरितां जहाज हाकारून दुसऱ्या दिवशीं त्याच्या एक्या बंदरांत नेऊन नांगरिलें, तेथें **ट्यूपिआ** ह्यानें सफर करणाऱ्यांस फार भय घातलें कीं, जर तुम्ही ह्या बेटावर उतरलां, तर **बोलाबोला** बेटांतील लोकांनीं हें नुकतेंच जिंकून घेतलें आहे, ते तुम्हांवर हल्ला करितील, व ते मोठे भयंकर आहेत असें मला वाटतें हें ऐकून **कूकसाहेब** व दुसरे गृहस्थ ह्यांनीं तेथें उतरण्याचा विचार रहित

केला असें नाहीं. तर ते लागलेच्च कांठावर गेले. तेव्हां त्यांबरोबर जाव-यास ट्यूपिआ ह्यानें मागें पुढें पाहिलें नाहीं. लेफटेनेंटकूक ह्यानें त्या बेटाच्या दरोबस्त कांठाची पाहाणी करावयास सांगितलें. हें पाहाणीचें काम चाललें असतां, ब्यांक्ससाहेब वगैरे ह्यांनीं तेथील लोकां बराबर व्यापार करण्याचा, आणि त्या देशांत उपजनिपज काय, व चमत्कारिक गोष्टी कोणत्या, ह्यांची चौकशी करण्याचा उद्योग चालविला; परंतु सांगाव-या जोगी विशेष गोष्ट त्यांच्या नजरेस पडली नाहीं. इतकेंच कीं, उत्तर अमेरिकेंतील इंडियन लोक जशी शत्रूच्या डोक्याची करोटी विजयाचें चिन्ह ह्मणून आणितात, तसीच येथें मनुष्यांच्या दाढांचीं कांहीं हाडें त्यांस आढळलीं; तीं बोलाबोला एथील योद्ध्यांनीं आपल्या विजयाची खूण ह्मणून बहुधा टांगून ठेविलीं होतीं.

त्या बंदरांतून जलपर्यटनार्थ बाहेर पडत असतां एंडेवर जहाज पोंवळ्यांच्या खडकाच्या कांठावर आपटण्याच्या महासंकटांत येऊन पडलें. ह्या जातीचे खडक दक्षिण समुद्रांतीलबेटांजवळ पुष्कळ पाहाण्यांत आले आहेत, आणि जरी ते क्वचित् पाण्याच्या वर दिसत नाहींत, तरी त्यां पासून वारंवार मोठें भय प्राप्त होतें.

कांहीं दिवस पर्यंत एक कंटाळवाणें जलपर्यटन केलें त्यावेळीं कितीएक लहान लहान बेटें पाहाण्यांत आलीं आणि मोठी नाव ओटहा बेटावर उतरली. तदनंतर लेफटेनेंट कूक हा युलीटिआ बेटास परत आला, परंतु पहिल्यानें तो ज्या भागोस गेला होता तेथें आतां गेला नाहीं. त्याबेटाच्या पश्चिमेच्या बाजूस एक बंदर होतें तेथें आगष्ट महि-

त्याच्या पहिल्या तारिखेस त्यानें जहाज नांगरिलें. कारण, जहाजावर निर्मिमाचा पुरावा घ्यावयाचा होता, आणि त्याच्या बुडास छिद्र पडलें होतें तें बंद करावयाचें होतें, ह्मणून तेथें मुकाम करणें जरूर पडलें.

दोघे गृहस्थ कांठावर गेले, तेव्हां तेथील लोकांनीं त्याचा आदर सत्कार पराकाष्ठेचा केला. कितीएक दिवस पर्यंत त्यांबराबर व्यवहार चालला होता, त्यावरून, ट्यूपिआ ह्यानें बोलाबोला एथील विजय पावले-ल्या लोकांविषयीं जें भय घातलें होतें तें अगदीं निर्मूळ असें दिसून आलें. त्या बेटाचा राजा भयंकर होता, त्याचें नांव ओपूनी त्यानें देखिल इंग्लिश लोकांचा सन्मान राखिला. तीन डुकरें, कांहीं कोंबडीं, आणि कापडाचे किती एक ताके, तसेंच पुष्कळ केळीं, नारळ, व दुसरे खाण्याचे पदार्थ ह्यांची त्यानें कूकसाहेबास भेट दिली. तिजबराबर सांगून पाठविलें कीं, उद्यां आपल्या भेटीस येण्याचा माझा विचार आहे. त्या प्रमाणें तो तर आला नाहीं; परंतु आपण दिलेल्या नजराण्या बद्दल कांहीं तरी मिळावें, ह्मणून जास्कदा ऐवजीं तिघी तरुण स्त्रिया त्यानें पाठविल्या होत्या. राजा आपल्याकडेस आला नाहीं ह्मणून तिसरे प्रहरीं आपणच त्याजकडेस जावें, असा बेत करून इंग्लिशलोक त्यांजकडे गेले. तो राजा तरुण, मोठा हुशार, व बळकट, असा असेल असें त्यांस पूर्वीं वाटलें होतें; परंतु तेथें गेले तेव्हां तो अशक्त, क्षीण, ह्मातारा आणि ह्मातारपणामुळें अर्धवट आंधळा झालेला, असा त्यांच्या दृष्टीस पडला. सफर करणाऱ्यांच्या योजिल्या बेता पेक्षां युलीटिआ मुकामीं जहाजाचें छिद्र बंद करावयास सुतारांनीं अधिक दिवस लाविले, ह्मणून लेफटेनेंट कूक ह्यानें बोलाबोला बेटाच्या

कांठावर जाण्याचा बेत केला होना तो रहित केला.

त्या बेटाच्या समुदायांत साहा बेटें होतीं, त्यांपैकीं चार बेटांचीं नांवें पूर्वी सांगितलीं. बाकी दोन राहिलीं, त्यांतून एकास तेथील लोक ट्यूपिआ व दुसऱ्यास मारूआ असें ह्मणत होते. ह्या सहाबेटांमध्यें इंग्लिशांनीं एकंदर, दीडमहिन्याहून कांहींसे अधिक दिवस घालविले. ह्यां खेरीज लहान लहान बेटें तेथें पुष्कळ होतीं, त्यांचा परस्पर संबंध होता ह्मणून कूकसाहेबानें त्यांस सोसायटी ऐलंडस् ह्मणजे बेटांची मंडळी असें साधारण नांव दिलें.

आगष्ट महिन्याच्या ९ तारिखेस जलपर्यटन करणाऱ्यांनीं दक्षिणेकडेस जहाज चालविलें, तंव्हां ते एक्या बेटाजवळ जाऊन पोंचले. ह्या बेटाचें नांव ओहीटरोआ असें आहे ह्मणून ट्यूपिआ ह्यानें सांगितलें. त्या बेटांतील राहाणाऱ्यांचा स्वभाव, कोणताही व्यापार करण्याविषयीं विरुद्ध होता, आणि त्याचा कांठही उतरायाविषयीं अवघड होता ह्मणून तेथें बंदर नकरितां कूकसाहेब तेथून चालता झाला.

सुमारें दोन महिन्यांनंतर जमीन दृष्टीस पडली. तिचे दक्षिणअक्षांश ३९ व पूर्व रेखांश १६८ अंश ५० कळा इतके होते, ती फार विस्तीर्ण होती. डोंगरांच्या चार पांच ओळी एकाहून एक उंच अशा दिसण्यांत आल्या, व त्यांच्या पलीकडे एक डोंगरांची सांखळी फारच उंच होती, ह्यावरून दक्षिण गोलार्धामध्यें एक नवें महाद्वीपच आतां आपणास सांपडलें, असें त्या सर्वपर्यटन करणाऱ्यांस वाटलें, परंतु त्यांनीं जी जमीन पाहिली ती न्युझीलंड नामक जें एक विस्तीर्ण बेट आहे, त्याचाच भाग होता,

त्या बेटाचा शोध, टासूमन ह्या नांवें करून हालंड देशांत राहा णाऱ्या एका नौकाध्यक्षानें लाविला होता, त्यास ह्यावेळेस, शंभरांवर वर्षे झालीं होतीं.

जहाज नांगरिल्यावर लेफटेनेंटकूक, ब्यांक्ससाहेब व डाक्तर सोलंडर हे हत्यारबंद मनुष्यें बराबर घेऊन, कांठावर गेले. थोडे अंतरावर कांहीं तद्देशीय लोक दृष्टीस पडले; त्यांजकडेस ते जात आहेत इतक्यांत, चार मनुष्यांनीं हातांत भाले घेऊन रानांतून एकाएकीं येऊन त्यांच्या एक्या नावेवर छापा घालावयाचा यत्न केला. ह्या तंट्याचा आरंभ लेफटेनेंटकूक ह्याच्या मागें झाला. व त्यांत एक असामी इंडियन गोळी लागून मेला. ह्याप्रकारें करून दुर्दैवामुळें अनर्थ घडला; तथापि त्यालोकांबराबर कांहीं व्यवहार चालवावा, अशी कूकसाहेबास उत्कृंठा होतीच ह्मणून समागमें आलेले गृहस्थ, ट्यूपिआ, कितीएक खलाशी व शिपाईलोक, ह्यांस बराबर घेऊन, दुसऱ्यादिवशीं तो कांठावर गेला. तेव्हां तेथीललोकांपैकीं पन्नास असामी त्यांची उघड वाट पाहात भुईवर बसले होते. ते मग एकाएकीं उठून उभे राहिले, व त्यांतून प्रत्ये कानें भाला, किंवा निव्वा दगडाचें केलेलें लहानसें हत्यार, बाहेर काढिलें, आणि तीं शस्त्रें, ते मोठ्या उघड वैरभावानें परजूं लागले; आणि त्या गृहस्थांनीं ह्याक्षणीं येथून जावें ह्मणून खुणा करूं लागले. ट्यूपिआ ह्यास त्यांजबराबर बोलावयास सांगितलें. तेव्हां मोठ्या प्रयासानें त्याच्या बोलण्याकडेस त्यांनीं लक्ष दिलें, व त्याचें बोलणें त्यालोकांस यथास्थित समजलें; असें पाहून इंग्लिशांस संतोष झाला. ट्यूपिआ

आणि न्युझीलंड एथील लोक ह्यांची भाषा एकच होती; परंतु बोल ण्याच्या चालींत थोडीशी तफावत होती. त्यानें त्यांस समजाविलें कीं, जल पर्यटन करणाऱ्यांस कांहीं खावयाचे पदार्थ, व पाणी ह्यांची गरज आहे, त्यां बद्दल ते तुह्मांस लोखंड देण्यास तयार आहेत. असें सांगून त्या धातूचे गुण त्यांना उमजून सांगण्याची त्यानें खटपट केली. तेव्हां ते व्यापार करण्याविषयीं उत्सुकसे दिसले, परंतु त्यां बराबर संभाषण झालें त्यांतील अभिप्रायावरून पाहातां त्यांची मसलत कांहीं विपरीत आहे अशी ट्यूपिआ ह्याची खातरी झाली. त्यांबराबर कांहीं करारही ठरेनात, आणि आपणास बिनहरकत घेऊन जाण्यास बरे असे जे जिन्नस त्यांस वाटले ते चोरून नेण्याचे त्यांनीं नाना प्रकारें यत्न केले. एक जणानें तर एक्या इंग्लिश गृहस्थापासून तरवार हिसकून घेतली, आणि तो हर्षानें ओरडत पळाला. दुसऱ्यांनीं हाणमार करण्याचा बेत दाखविला ह्मणून त्यांवर गोळी चालविणें अवश्य पडलें. तेव्हां तरवार नेणारा तर ठार मारला गेला, व दुसरे दोघे तिघे जखमी झाले. पुढें त्यालोकांबराबर स्नेह करण्याविषयीं इंग्लिशांनीं यत्न केला, परंतु कांहीं फळ झालें नाहीं. शेवटीं अकटोबरच्या अकराव्या तारिखेस लेफटेनेंट कूक ह्यानें त्या पाहुण्यांचा अनादर करणाऱ्या बेटाहून आपलें जहाज हाकारिलें, आणि तो तेथून चालता झाला.

आतां न्यूझीलंड बेटा सभोंवती प्रदक्षिणा घालावी, असा बेत करून त्यानें तें काम केलें. त्या बेटाचा तपास करायाला क्रमकसर साहा महिने लागले; इतक्या काळांत निरनिराळ्या समुद्र कांठावर राहाणाऱ्यां-

विषयीं त्यास बरीच माहिती झाली. तसेंच त्या बेटासंबंधी समुद्र व भूमि ह्यांविषयींच्या कितीएक गोष्टी त्यास समजल्या. तेथील लोकांविषयींचें वर्तमान ह्मटलें ह्मणजे ते मनुष्याचें मांस खाणारे आहेत असें निःसंशय प्रत्यत्यास आलें.

कूकसाहेबानें न्यूझीलंड बेटा भोंवती कसकशी प्रदक्षिणा घातली ह्योविषयीं यथाक्रम विवरण करणें अशक्य आहे, ह्मणून त्यासंबंधी ज्या थोड्याशा गोष्टी लिहिलेल्या आहेत त्याच निवडून सांगतों.

एकासमयीं, कांहीं मासे खरेदी करण्याचा उद्योग चालला असतां, ट्यूपिआ ह्याचा मुलगा, नामें टेईटो, हा खरीद केलेला माल वर घेण्याकरितां गलबताच्या कांठावर ओणवा झाला होता; इतक्यांत न्यूझीलंड बेटांतील एका मनुष्यानें त्यास अकस्मात् पकडून एक्या होडींत घातलें, आणि होईल तितकी त्वरा करून होडी पळवून नेली. असा जुलुमाचा प्रकार घडला ह्मणून, जहाजावरील शिपाईलोकांस बार झाडण्याचा हुकूम देणें प्राप्त झालें. हा हुकूम होतांच एकानें बार केला, तेव्हां इंडियन लोकांनीं त्यामुलास सोडून दिलें. त्याकाळीं त्यानें लागलीच पाण्यांत उडी घातली, आणि पोंहत पोंहत जहाजापाशीं येऊन तो बचावला.

न्यूझीलंड बेटाच्या निरनिराळ्या कांठांवरील अज्ञान लोक इंग्लिशलोकांबराबर बहुधा प्रतिदिवशीं वैरभावानें वर्तणूक करीत असत, ह्मणून त्यांजबराबर व्यवस्थितपणें वागावयास, कूकसाहेब व त्याच्या हाता खालचे कामदार ह्यांमध्यें उत्कृष्ट शहाणपणें, व मन स्वाधीन ठेवणें, हे गुण असणें अवश्य होतें

नोवेंबरच्या दहाव्या तारिखेस गुरुवारीं **कूकसाहेब, ब्यांक्स साहेब,** व दुसरे गृहस्थ हे बराबर दोन नावा घेऊन, **न्यूझीलंड** बेटाच्या कांठचे अखातास एक मोठी नदी येऊन मिळाली आहे, तिचा तपास कर ण्या करितां गेले. त्या अखातास **कूकसाहेबानें मर्क्युरीचे** असें नांव दिलें. ह्या ठिकाणीं अनेक प्रकारच्या सोई होत्या, त्यापुढें होणाऱ्या जलपर्यटन करणाऱ्यांच्या उपयोगाकरितां त्यानें लिहून ठेवण्याविषयीं मेह- नत केली. हिंवाळ्यांत अथवा पुष्कळ दिवस पर्यंत एखाद्या जहाजास येथें मुकाम करण्याचा प्रसंग आला, तर त्या जागेंतील द्वीपकल्प ह्यावर तंबू देण्यास पुरेशी प्रशस्त जागा आहे, तेथें तंबू देतां येतील आणि ते अल्पश्रमानें इतके मजबूद करितां येतील कीं, आसपासच्या प्रदेशांतील लोकांनीं सर्व बळ खर्चिलें तरी ते जिंकिले जावयाचे नाहींत. असें त्यानें लिहून ठेविलें.

डिसेंबरच्या पांचव्या तारिखेस **एंडेवर** जहाजास खडकावर आप- टण्याचें मोठें संकट प्राप्त झालें. तें असें, रात्रीं अकरा वाजण्याच्या सुमारास जहाज एकाएकीं स्थिर उभें राहिलें, व पाण्याच्या लोटानें जमीनीकडे तें इतक्या त्वरेनें लोटत गेलें कीं, त्याच्या बचावा करितां कांहीं तजवीज कर- णार तों, जेथें उथळ जमीन असून लाटा फुटत होत्या त्या ठिकाणापासून. तें कासराभर अंतरावर जाऊन ठेपलें. असा प्रसंग प्राप्त झाला असतां, नावाच्या बुरकुलांत जहाजास धरावें, ह्मणून नाव बाहेर टाकिली. आणि माणसें पराकाष्ठेची मेहनत करूं लागलीं. इतक्यांत दैवयोगानें जमीनीच्या आंतून मंदवाऱ्याची लपेट येऊं लागली, तेणें करून तें जहाज काठापासून

पलीकडेस झालें. हें पाहून पर्यटन करणाऱ्यांस अवाच्य आनंद झाला. आतां आपलें संकट टळलें असें **कूकसाहेब** व त्याचे मित्र ह्यांस वाटलें, परंतु सुमारें एक्या मासानंतर गलबत खडकावर लागलें, त्या हेलकाव्यानें सर्वांस अतिशय भय प्राप्त झालें. परंतु ज्या खडकावर जहाज घासलें तो वाऱ्याच्या बाजूस होता ह्मणून थोडेंही नुकसान न पावतां तें पलीकडेस हटलें.

सन १७७० रां तील जानेवारी महिन्याच्या १४ व्या तारिखेस सफर करणारे **न्यूझीलंड** बेटाच्या एक्या अखातांत येऊन पोंचले. त्या अखातास **कूकसाहेबानें क्वीन-चार्लट सूसौंड** ह्मणजे चार्लट राणीचें अखात असें नांव दिलें. गलबताचें तळ फार खराब झालें होतें ह्मणून तें एथें नीट करून, व दुसरे कांहीं अवयव होते ते सुधारून, सर्पण व पाणी ह्यांचा सांठाही करून घ्यावा असा त्यानें बेत केला. जवळचा प्रदेश हा एक अखंड व विस्तीर्ण असें अरण्य होतें, त्या मधून सुंदर पाण्याचे ओहोळ पुष्कळ वाहात होते. मग ते गृहस्थ जमीनीवर उतरले, आणि त्यांनीं बराबर एक जाळें आणिलें होतें, तें एक दोन वेळां लाविलें त्यापासून त्यांचें इतकें काम झालें कीं, कमकसर तीन हंड्रेड्वेट[+] वजनाचे अनेक प्रकारचे मासे जाळ्यांत सांपडले; त्यांपासून गलबतावरच्या मंडळीस एक उत्कृष्ट भोजन मिळालें.

सोळाव्या तारिखेस **कूकसाहेब** व कांहीं मंडळी जमीनीवर

---

[+] हंड्रेड्वेट ह्मणून एक इंग्लिश वजन आहे.

उतरली होती, तेव्हां त्यांनीं एक इंडियन लोकांचें कुटुंब पाहिलें, त्या मध्यें मनुष्याचें मांस खाण्याची क्रूर चाल चालू होती, ह्याविषयींचे निःसंशय प्रत्यय त्यांचे अनुभवास आले.

दुसऱ्यादिवशीं एक्या आनंदकारक गोष्टीनें पर्यटन करणाऱ्यांचें चित्त वेधिलें; तो प्रकार असा, कांठापासून पावमैलासही कांहीं कमी इतक्या अंतरावर गलबत असतां, रात्रीं पक्ष्यांच्या एक्या मोठ्या ठोळीचें गाणें ऐकून ते जागे झाले. ते पक्षी एकमेकांच्या ईर्ष्येनें आपले गळे ताणून शब्द करीत होते, असें भासतें. ह्यापूर्वीं त्यांनीं अशा प्रकारचें जें गानगायन ऐकिलें होतें, त्यापेक्षां हें सरस होतें. फार सस्वर अशा लहान लहान घंटांच्या सारिखा त्यांचा ध्वनि वाटला. चौकशी करितां असें समजण्यांत आलें कीं, मध्यरात्री नंतर दोन तासांनीं हे पक्षी तेथें सर्वदा गायनास आरंभ करून सूर्योदय झाल्यानंतर सारादिवस उगेच असतात.

एकुणिसाव्या तारिखेस हत्यारें करणाऱ्यांची भट्टी सुरू झाली, व भेगा बंदकरणें व गलबता संबंधी दुसरीं आवश्यक कामें करणें, ह्यांमध्यें जहाजावरील सर्व मंडळी गुंतली, तेव्हां कांहीं इंडियन लोक मासे घेऊन आले होते, त्यांनीं ते देऊन खिळे घेतले. कारण त्यांचा उपयोग व किंमत हीं त्यांस समजूं लागलीं होतीं.

ह्यानंतर थोड्या दिवसांनीं आपल्या बराबर एक खलाशी घेऊन कूकसाहेब जवळच्या एक्या टेंकडीवर चढला; माथ्यावर गेला तेव्हां त्या प्रदेशाच्या पूर्वेकडेस त्यानें समुद्र पाहिला. तेथून त्या प्रदेशाच्या पश्चिमेकडेस जाणारा असा एक मार्ग त्याच्या दृष्टीस पडला. तो मार्ग, ज्या

खाडींत गलबत नांगरिलें होतें तिजपासून किंचित् पूर्वेकडेस होता.

ह्या खाडीच्या आग्नेयी दिशेकडील भूभाग, हा केवळ उंच उंच डोंगरांची अरुंद रांग आहे व तीच ह्या सामुद्रधुनीची नैऋत्य बाजू आहे असें दिसण्यांत आलें, समोरच्या बाजूकडेस पूर्वेकडच्या अंगास दृष्टि पोंचे पर्यंत ती भूमि विस्तीर्ण होती, आणि आग्नेयी दिशेकडे समुद्रास खोलवा होता, त्याचें पाणी पूर्वतीरास लागलें होतें.

आणखी नवेशोध व तपासणी हें करण्यांत दुसरा दिवस मोडला; २६ व्या तारिखेस, एका अतिशय उंच डोंगरावरून पूर्व आणि पश्चिम ह्या दोन समुद्रांच्या मधील सामुद्रधुनी स्पष्ट त्यांचे नजरेस पडली. ह्यावरून गलबत समुद्रांत लोटण्याजोगें तयार होतांच, त्यांत बसून त्या मार्गाचा शोध करावा असा कूकसाहेबानें निश्चय केला.

न्यूझीलंड बेटा मध्यें ह्या वेळ पर्यंत जे लोक पाहाण्यांत आले त्यापेक्षां ह्या कांठाच्या भागीं राहाणारे लोक नम्र व पाहुण्याचा सत्कार करणारे आहेत असे अनुभवास आलें. त्यांनीं बोलाविल्यावरून कूकसाहेब, आपले मित्र, व ट्यूपिआ ह्यां सहवर्तमान जवळच एक गांव होता, तो पाहावयास गेला. त्यांत ऐंशीपासून शंभर पर्यंत घरें होतीं, व तो एका लहानशा खडकावर बांधिला होता. तेथें जाणें इतकें अवघड होतें कीं, जलपर्यटन करणाऱ्यांस तें जीवावरचें ओझें झालें. तेथील लोकांनीं मोठ्या स्नेहभावाच्या रीतीनें ह्यांची भेट घेऊन त्या सर्व ठिकाणांतून त्यांस फिरविलें, व जें जें तेथें होतें तें सर्व मोकळेपणानें त्यांस दाखविलें. थोडेसे खिळे व फिती, आणि कांहीं कागद, असे गांवकऱ्यांस देऊन त्यांपासून सुकविलेले मासे घेतले, ते त्यांनी

# सोळावा संध्याकाळ.

नित्याचे वेळेस मंडळी जमतांच गोपाळानें खालीं लिहिल्या प्रमाणें आपली गोष्ट पुनः चालू केली.

## कूकसाहेबानें पृथ्वीभोंवतें प्रथम जलपर्यटन केलें, त्याची कथा पुढें चालू.

सन १७७० रांतील मार्च महिन्याच्या एकतिसाव्या तारिखेस शानिवारीं सफर करणाऱ्यांनीं न्यूझीलंडबेट सोडिलें. आणि एकुण वीस दिवस पर्यंत थेट पश्चिमेकडेसच गलबत चालविलें, तेव्हां न्यूहालंड बेटापासून ते दृष्टीच्या टप्प्यांत आले. त्या बेटाच्या पूर्वेकडील कांठास हल्लीं "न्यूसोथवेल्स्" असें ह्मणतात. एप्रिल महिन्याच्या अठ्ठाविसाव्या तारिखेस त्यांनीं एका आखातांत जहाज नांगरिलें. त्या आखाताच्या तीरावर अनेक प्रकारचीं अपूर्व झाडें पुढें त्यांच्या पाहाण्यांत आलीं, त्यावरून त्याचें नांव बाटनीबे ह्मणजे उद्भिद आखात असें ठेविलें.

नावा समुद्रांत टाकिल्या, आणि कूकसाहेब व त्याचे मित्र हे ट्यूपिआ ह्यास बरावर घेऊन, बल्हीं मारीत कांठाकडेस चालिले, ते एका खडकापाशीं जाऊन पोंचताहेत इतक्यांत त्यांच्या उतरण्यास हरकत करावी ह्मणून, दहा दहा फीट लांबीचे भाले हातांत घेऊन दोघे इंडियन पुढें सरसावून आले. आणि ते ह्या परकीय लोकांस मोठ्यानें हाकामारून कठोरपणानें तोंड वाकून बोलूं लागले. ट्यूपिआ ह्यास

न्यूझीलंड एथील लोकांबराबर पाहिजे तें संभाषण करितां येत असे, पण त्यास ह्यांच्या बोलण्यांतील एकाही शब्दाचा अर्थ समजला नाहीं. त्यानंतर ते आपलीं शस्त्रें परजूं लागले, व जरी इंग्लिश चाळीस आसामी व ते दोघेच, होते, तरीं चालेल तितका यत्न करून आपल्या कांठाचें रक्षण करण्याचा त्यांनीं निश्चय केला आहे असें दिसून आलें. त्यांचें धैर्य पाहून कूकसाहेबास कौतुक वाटलें, आणि थोडक्यां बराबर बहुतांनीं लढाई करावी हें त्यास बरें वाटेना, ह्मणून आपली नाव पाण्यांतच ठेवण्याविषयीं त्यानें हुकूम केला. मग तो व दुसरे गृहस्थ ह्यांनीं, खुणाखाणा करूनच त्यांजबरोबर सल्याचें बोलणें चालविलें; आणि त्यांच्या मर्जीसंपादन करण्या करितां त्यानें खिळे, पोत, व दुसरे फिरकोळ पदार्थ, त्यांजकडेस झोंकिले, तणेंकरून ते फार खुष झालेसे दिसले. त्यानंतर आपल्यास पाणी पाहिजे हें त्यांस समजून सांगायास, व तुह्मांस [illegible] देण्याचा आमचा अगदीं [illegible] नाहीं असी त्यांची खात्री करून [illegible], कूकसाहेबानें प्रयत्न केला. इंडियन लोक हातवारे करीत होते, ते आपल्यास [illegible] करितांच, असा त्यांचा अर्थ करून इंग्लिशांनीं नाव कांठाशीं [illegible] नावेस हरकत करूं लागले. शेवटीं त्या [illegible] त्यांच्या मध्यें [illegible] मात्र एक इलाज कूकसाहेबापाशीं उरला, तोही केला, [illegible] त्यां मध्यें जो धाकटा होता त्याजवळून भाल्यांचें एक जुडगें खडकावर गफलतीनें राहिलें. परंतु त्याचें त्यास लागलेंच स्मरण झालें आणि अतित्वरेनें त्यानें तें उचलून घेतलें. मग त्यांनीं एक धोंडा मारिला, ह्या

वरून, कूकसाहेबानें लहानशी गोळी घालून बंदुक सोडायाचा हुकूम केला. ती गोळी एका जणाच्या तंगडीस लागली, तेव्हां तो लागलाच पळून गेला. तेसमयीं तंटा मिटला असें धाडून कूकसाहेब आपल्या मंडळी सुद्धां जमीनीवर उतरला. परंतु ते आपल्या नावेंतून उतरले इतक्यांत, आपल्या संरक्षणार्थ एक ढाल आणावया करितांच केवळ जो इंडियन खडक सोडून गेला होता तो परतला. जवळ येतांच तो आणि त्याचा सोबती ह्या दोघांनीं इंग्लिशांच्या टोळीमध्यें भाले फेंकिले, परंतु त्यां पासून दैवयोगानें कोणाएकासही उपद्रव झाला नाहीं. तिसऱ्यानें बंदुक सोडिली तेव्हां ते दोघे इंडियन अगदीं पळून गेले.

ह्या नंतर इंग्लिशांनीं थोड्या अंतरावर कांहीं झोंपड्या पाहिल्या; त्यांच्याजवळ गेले तों कांहीं लेंकरें मात्र तेथें होतीं, बाकी सर्व राहाणारे त्यांस सोडून गेले होते. ह्या झोंपड्यांत त्यांनीं कांहीं पोत, फिती, कापडाचे तुकडे, आणि दुसरे पदार्थ, ज्यांच्या योगें त्यालोकांच्या मर्जीचें संपादन होईल असें वाटलें ते टाकिले. परंतु फिरून दुसऱ्यादिवशीं जेव्हां ते आले, तेव्हां त्या पदार्थांपैकीं कांहींच हालले नव्हते, आणि एकही इंडियन दृष्टीस पडला नाहीं, हें पाहून त्यांस वाईट वाटलें.

तिसाव्या तारिखेस कितीएक इंडियन लोक दृष्टीस पडले, परंतु इंग्लिशांच्यानीं त्यांस कोणताही व्यवहार करायास प्रवृत्त करवलें नाहीं. ते कांहींसे जवळ येऊन बहुत वेळां आनंदाच्या आरोळ्या मारून मागल्यानें रानांत गेले. ह्याप्रमाणें त्यांनीं पुनः एकवेळ केलें तेसमयीं कूकसाहेब कांहीं हत्यार नघेतां स्वतां समुद्राच्या कांठाकांठानें त्यांच्या मागें बराच लांब

गेला, परंतु त्याच्यानेंही त्यांस उभें करवलें नाहीं.

मे महिन्याच्या पहिल्या तारिखेस देशांत फेरी करावी, असा त्यानें विचार केला. त्याप्रमाणें ब्यांक्ससाहेब, डाक्तर सोलंडर, व दुसरे सात आसामी, असे बरोबर घेऊन कूकसाहेब निघाला, ते सर्व, त्या मोहिमी करितां हत्यारें वगैरे घेऊन यथास्थित तयार झाले होते; समुद्राच्या कांठाजवळ झोंपड्या होत्या, तेथें कांहीं इंडियनलोक नित्य राहावयास जात असत, त्या ठिकाणीं हे पहिल्यानें गेले. मागें ज्या जिनसा एथें ठेविल्या होत्या त्या कोणीं नेल्या नव्हत्या, म्हणून इंग्लिशांनीं कापड, कांचमणी, फण्या, आरसे, इत्यादि अधिक मोलाचे पदार्थ तेथें ठेविले. ह्यानंतर ते देशाच्या मध्य प्रांतांत गेले, तेथें त्यांनीं तद्देशीय लोकांचीं उकळ घरें पाहिलीं, परंतु मनुष्य असा एकच दृष्टीस पडला, तोही नजरेस पडतांक्षणींच पळून गेला. ते जेथें जेथें गेले, त्या सर्व ठिकाणीं त्यांनीं पदार्थ ठेविले, मनांत कीं तेणेंकरून शेवटीं त्यालोकांचा विश्वास व मर्जी आपणावर बसेल. जनावरांच्या कांहीं खुणा त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आल्या, व तेथील झाडांवर नानाप्रकारचे पक्षी पाहिले, त्यांतून कितीएक तर फारच सुंदर होते.

ह्यानंतर कितीएक इंडियनलोक बहुतवेळां दृष्टीस पडले, व त्यांच्या कृपेचें संपादनकरण्याविषयीं होतील तितके उपाय केले, तथापि त्यांजबराबर कोणताही व्यवहार चालू होईना. त्यांचा रंग काळा आणि ते अगदीं वस्त्रहीन होते. त्यांची संसार करण्याची रीति कोणत्या प्रकारची होती, ह्याविषयीं कांहींच समजलें नाहीं; तसेंच त्यांची संख्या फार होती, किंवा ते मंडळी मिळून रहात होते असेंही दिसण्यांत आलें नाहीं. समुद्राच्या

कांठा कांठानें व रानामधून त्यांनीं कुटुंबें पसरलेलीं होतीं, असें मान पहा ण्यांत आलें.

मे महिन्याच्या साहाव्या तारिखेस रविवारीं पहांटेस सफर करणाऱ्यांनीं बाटनीबे एथून निघून समुद्रकांठानेंच अलीकडे जहाज चालविलें. तीरा जवळची जमीन बहुतकरून खोलवट व वाळूसर होती; परंतु झाडझाडीनें भरलेलीं नानाप्रकारचीं आणि सुंदर अशीं मैदानें, डोंगर, व खोरीं, हीं ही कितीएक ठिकाणीं होतीं. चालू झाल्यापासून दाहा दिवसां नंतर दुर्बिणींतून त्यांनीं पाहिलें तों तद्देशीय लोकांच्या वीस आसाम्या दृष्टीस पडल्या; त्यांतून एकेकाच्या पाठीवर एकेक मोठालें गठ्ठें होतें. एका तासापेक्षां अधिकवेळ पर्यंत इंग्लिशलोक त्यांस टेहेळीत होते, परंतु त्यांतून एकजण ही उभा राहून त्या जहाजाकडे पहातांना आढळण्यांत आला नाहीं. तरी त्यांच्या दृष्टीस तें गलबत पडलें नसेल हें संभवत नाहीं, आणि त्यांनीं आपल्या जन्मांत जे पदार्थ पाहिले असतील त्यांमध्यें तें त्यांस केवळ अद्भुत व अतर्क्य असा पदार्थ दिसला असेल ह्यांत संशय नाहीं.

मे महिन्याच्या बाविसाव्या तारिखेस एक्या खाडींत त्यांनीं जहाज नांगरिलें, तेथून जवळील कांठावर मालढोक जातीचा एक विलक्षण मोठा पक्षी गोळी घालून मारिला, त्यावरून त्या खाडीचें नांव बस्टर्डबे ह्मणजे मालढोक अखात असें ठेविलें. कूकसाहेब व दुसरे गृहस्थ हे ट्यूपिआ आणि आरमारीलोकांची एक टोळी, असे बराबर घेऊन त्या देशाच्या मध्यभागांत कांहीं अंतरा पर्यंत गेले. ते गेल्याच्या मागें सरासरी वीस आसामी तद्देशीयलोक समुद्राच्या कांठावर आले आणि थोडा-

वेळपर्यंत जहाजाकडेस पाहून निघून गेले. धूर, विस्तव, खाण्याच्या पदार्थांचा साठा चाराचुरा, असे त्या देशांत वस्ती आहे याविषयींचे बहुत दाखले त्या गृहस्थांस मिळाले; परंतु त्यावेळीं तेथें एखादें घर, किंवा पूर्वीं घर असण्याची खूण ही पाहाण्यांत आली नाहीं. यावरून त्यालोकांस घरें, व पांघरुणें, नाहींत व त्यांच्या भोंवतीं राहाणाऱ्या वनपशूं प्रमाणेंच, ते रात्रीं देखील उघड्या जागेंत राहातात असें अनुमान केलें.

तेथून आणखी उत्तरेकडेसच जात असतां समुद्रकांठची एक खाडी पाहिली. गलबत कांठावर नेऊन त्याचें तळ साफ करण्यास हें ठिकाण सोयकर पडेल असें कूकसाहेबास वाटलें. तेव्हां तो, ब्यांक्ससाहेब, डाकुतर सोलंडर व ट्यूपिआ, असे त्या कामासाठीं सोयवार जागा शोधून काढायाकरितां कांठावर उतरले. जमीनीवर एक्या जातीचें गवत होतें. त्याचें बीं फार अणकोचीदार व कुसळांनी भरलेलें होतें; त्यामुळें तेथें चालणें फार दुःखदायक होतें. तें बीं पदोपदीं त्यांच्या वस्त्रांस चिकटे, आणि जेथें जेथें तें चिकटे, तेथें तेथें त्याचे कांटे आंत मासा पर्यंत शिरत. दुसरी एक वाईट गोष्ट होती ती अशी, एक्या जातीचे मोठाले भोंवरे तेथें होते. ज्यांस मस्किटस असें ह्मणतात, त्यांच्या दंशामुळें त्यांस फार पीडा झाली. जहाज कांठावर आणायास सोयकर अशा पुष्कळ जागा त्यांस लौकरच सांपडल्या; परंतु गोडें पाणी अगदीं मिळालें नाहीं ह्मणून ते फार खट्टू झाले. आणखी पुढें देशांत जाऊं लागले तेव्हां, त्यांनीं मार्गांत डिंकाचीं कितीएक झाडें पाहिलीं. त्यांच्या फांद्या

वर प्रत्येकीं बुशेलला* एवढें मोठें, असें मुंग्याचें खोपें चिकणमातीचें केलेलें होतें. त्या खोप्यांत राहाणाऱ्या मुंग्या लहान लहान व पांढऱ्या रंगाच्या होत्या. डिंकाच्या झाडांची दुसरी एक जात होती; तीवर काळ्या रंगाच्या लहान मुंग्या होत्या, त्या सर्व फांद्यांत भोंकें पाडून आंतील मगज बाहेर काढून टाकून त्या नळीमध्यें राहात असत. इतकेंही असून त्या किड्यांची संख्या आश्चर्य वाटाया जोगी होती. तथापि त्यांनीं ज्या भागांत राहायास घरें केलीं होतीं, त्यांवर पानें व फुलें आलीं होतीं व ते अगदीं टवटवीत होते. पतंगाच्या तर इतक्या झुंडी होत्या कीं त्यांचें वर्तमान बहुतकरून असंभाव्य दिसाया जोगें होतें. अभाळांत तीन चार एकरपर्यंत** त्यांची इतकी दाटी झाली होती कीं, प्रत्येक दिशेकडेस ते लक्षावधि दृष्टीस पडत होते. ह्यां खेरीज ज्यांस पांख फुटले नव्हते, अशा पतंगांनीं झाडांच्या फांद्या व डाहाळ्या भरून गेल्या होत्या.

अशा नानाप्रकारच्या पदार्थांच्या दर्शनें करून **कूकसाहेब** व त्याचे मित्र ह्यांची अपूर्व दर्शनेच्छा तृप्त झाली, तथापि गोडें पाणी शोधून काढण्याचा त्यांचा मुख्य उद्देश होता, त्याविषयीं ते निराश झाले. त्या वरून येथें फार दिवस राहूं नये, असा त्यानें बेत केला. व तेथें पाणी मिळालें नाहीं म्हणून त्यानें त्या खाडीचें नांव **थरसूटीसौंड**, म्हणजे तान्हेली खाडी, असें ठेविलें. ह्या वेळापर्यंत **न्यूसौथवेल्स्** ह्याच्या कांठानें एक हजार तीनशांहून अधिक मैलपर्यंत **कूकसाहेब** ह्यानें आपलें गलबत

---

* बुशेल म्हणून एक इंग्लिश माप आहे.
** जमीनीच्या लांबीचें मान आहे.

निर्भयपणें चालविलें, परंतु त्यानें ज्यास पूर्वी त्रिनिटी बे असें नांव दिलें होतें, त्या अखातांतून जात असतां, ज्यून महिन्याच्या दहाव्या तारिखेस, नौकागमनाच्या इतिहासांत जे संकटाचे व भयंकर प्रसंग वर्णिले आहेत, तशा स्थितींत गलबत येऊन पडलें. तें असें, स्वच्छ निरभ्र चांदणे रात्रीं चांगला वारा लागून गलबत चालत असतां, एकाएकीं तें उथळपाण्यात आहे असें दिसून आलें, त्यावरून सर्वांस भय प्राप्त झालें, परंतु पाणी खोल लागलें असें पुढें लागलेंच समजण्यांत आल्यावरून तें भय दूर झालें. अकरा वाजायाचा सुमार होई पर्यंत नौकेचें ठीक रीतीनें व गलबत बिन धोक चाललें होतें, परंतु अकरा वाजतां थोड्याच वेळांत सात वांवापर्यंत पाणी उथळ झालें, त्यानंतर लागलेंच गलबत खडकावर घांसलें व तेथून तें निघेनासें झालें. ज्या खडकावर तें फसलें होतें त्यावर भरतीमुळें पाण्याच्या लाटा आपटत होत्या, तेणेंकरून मात्र तें डळमळत होतें. तेव्हां गलबतांतील मनुष्यें ह्यांची, त्या अवस्थेस योग्य अशी मुखचर्या होऊन, तीं सर्व थोड्यापळांत गलबताच्या मजल्यावर आलीं. सफरकरणाऱ्यांनीं जाणिलें कीं, एथून कांठा फार जवळ असणें ही गोष्ट अशक्य आहे. आणि पोंवळ्यांच्या खडकावर आपण आहों, असा सिद्धांत करायास त्यांस चांगलें प्रमाण मिळालें. त्या खडकाचे फळ अणीदार आणि पाठ खरबरीत असते, त्यामुळें इतर खडकांपेक्षां त्यापासून गलबतास फार भय असतें. चौकशी करतां, गलबत खडकाच्या कांठावरून वर होऊन खडकाच्या मधील खोलव्यांत आलें आहे असें दिसून आलें. अणखी चांदण्याच्या योगानें दिसण्यांत आलें कीं, जहाजाच्या तळापासून

सर्व पुस्तीचे तक्ते दोहीकडे पाण्यावर तरंगत आहेत, असें कीं, गलबता वरील सर्व मंडळी समुद्रांत बुडून जाण्याचा प्रतिक्षणीं मार्ग पडत चालि ला, ह्या प्रकारें त्यांची विपत्ति कमी होती ती पूर्ण झाली. आतां गलबत हलकें केल्याशिवाय संरक्षण होण्याचा दुसरा उपाय राहिला नाहीं. गलबत हलकें करण्यांत व्यर्थ काळ जाऊं नये, ह्मणून पिंपांतील पाणी कोठीमध्यें ओतून बंबानीं वर उडविलें; आणि सहा तोफा मात्र गलब-ताच्या वरील मजल्यावर ठेवून बाकी लोखंडाचें व दगडाचें निलिम, पिंपें, वाटोळ्या फळ्या, तेलाच्या बरण्या, आणि खराब झालेला सरंग जाम, तागवा बाहेर टाकून दिला. सर्व मनुष्यें, कुरकूर नकरितां व त्रास न करितां स्वतां काम करायास झटूं लागलीं, इतकेंच नाहीं, तर त्याविषयीं त्यांस हौस वाटून तीं बहुत करून प्रसन्न वदनही झालीं. त्या काळीं आपल्या स्थितीच्या भयंकरपणाविषयीं त्या मनुष्यांच्या मनांत इतकें वागूं लागलें कीं, कोणा एकाच्याही तोंडातून अपशब्द निघेनासा झाला. जेव्हां मृत्यु अतिसन्निध आला असें दिसलें तेव्हां, अन्यायांत सांपडूं ह्या भयानें अपवित्र शब्द बोलण्याची निंद्य रीति तत्क्षणीं दूर झाली.

दुसऱ्यादिवशीं प्रातःकाळीं जहाजावरील मंडळीस आपल्या संक-टाचें पूर्णस्वरूप दृष्टीस पडलें; तें असें, जमीन नजरेस पडली, परंतु ती कनिष्ठपक्ष चोवीस मैल होती; व जर गलबत फुटून तुकडे झाले तर होड्यांत बसूनं कांठावर जाऊन तेथून पलीकडेस जमीनीवर जातां येईल, अशा रीतीचें मध्यें बेटही नव्हतें, परंतु वारा हळू हळू कमी होऊन, सकाळीला अगदीं शांतता झाली, अशा प्रकारें हा प्रसंग ईश्वरीसूत्राच्या व्यवस्थेमध्यें

परम सुखदायक घडला; कारण, जर वाऱ्याचा झपाटा चालला असता, तर तें जहाज अनिवारपणें नाश पावलें असतें. सकाळचे अकरा वाजतां भरती येईल असा सुमार होता, व गलबत तरंगलें तर त्यास पलीकडे लोटाया करितां सर्वसिद्धता केली होती, पण तें दीड फूटही तरंगलें नाहीं. हें पाहून सफर करणाऱ्यांस आश्चर्य व चिंता उत्पन्न झाली. ह्मणून तें आणखी हलकें करणें अवश्य पडलें, ह्यास्तव जे पदार्थ बहुधा टाकवतील ते सर्व गलबता बाहेर टाकिले. हावेळपर्यंत गलबतांत फारसें पाणी शिरलें नव्हतें, पण ओहोट होतांच इतक्या झपाट्यानें पाणी आंत शिरूं लागलें कीं, जरी दोन बंब एक सारखे चालू ठेविले होते, तरी तें पाणी खंडलें नाहीं. मध्य रात्रीच्या भरती खेरीज आतां दुसरी आशा राहिली नाहीं, ह्मणून त्यावेळे करितां तयारी करण्यास ते मोठी कडून मेहेनत करूं लागले. संध्याकाळीं पांच वाजायाचे सुमारास भरतीचें पाणी चढूं लागलें; इतक्यांत गलबताचें छिद्र भयंकर रीतीनें मोठें झालें. ह्याजकरितां आणखी दोनबंब तयार केले, परंतु दुर्दैवानें त्यांमधून एक चालेना; तथापि तीन बंब चालू ठेविले होते. तेव्हां रात्रीं नऊ वाजतां गलबत स्थितीवर आलें. परंतु छिद्र एवढें मोठें झालें होतें कीं खडकाचा आधार सुटला ह्मणजे लागलेंच गलबत खचित बुडेल असें अनुमान झालें. **कूकसाहेब** व त्याचे लोक त्यांस हा मोठा भयंकर प्रसंग प्राप्त झाला, असा कीं, गलबत तरंगलें तर निश्चय आपली संकटा पासून मुक्तता होईल असें तर नाहींच, पण तेणेंकरून बहुधा आपला नाश होईल असें भाकित करणें त्यांस जरूर झालें.

त्या सफर करणाऱ्यांस मृत्यूचा भयंकर समय आतां प्राप्त झाला.

आणि प्रत्येक मनुष्यास, आपल्या सोबत्यांच्या चेहेऱ्यावर स्वातुभावाचें प्रतिबिंब दिसूं लागलें. इतकेंही असून ते निराश झाले असें नाहीं. पाण्याचें आंत शिरणें बंद करायास, व भयंकर ठिकाणांतून गलबत मोकळें करायास, त्यांनीं होईल तितका प्रयत्न केला. तेव्हां तारूं तरंगलें. आणि तें खडकावर होतें तेव्हांपेक्षां आतां फार पाणी आंत येऊं लागलें असेंही झालें नाहीं. ही गोष्ट कांहीं अल्प संतोषाची नव्हती. तथापि त्यावेळीं कोठीमध्यें सरासरी चार फुट पाणी होतेंच. त्या मनुष्यांनीं चोविसांपेक्षां अधिक तास पर्यंत, पाणी कमी करायाकरितां पराकाष्ठेची मेहेनत केली, तथापि तें इतक्या त्वरेनें आंत येत होतें कीं, आपला यत्न सफळ होईल ह्याविषयींची त्यांस थोडीच आशा राहिली होती. त्यावेळीं त्यांना इतकी मोठी मेहनत झाली कीं, त्यांच्यांतून एकाद्यानेंही पांच साहा मिनिटंपर्यंत एक सारिखें संतत बंब चालविणें होईना. तितकें केल्यावर ते अगदीं दमून जात, त्यामुळें, जरी गलबताच्या मजल्यावर तीनपासून चार इंच पर्यंत ओंढाळा असा पाण्याचा ओघ बंबापासून वाहत होता, तरी त्यावर ते एकामागून एक असे आंगें टाकीत. इतकें असून ही त्यांनीं प्रयत्न करणें सोडिलें नाहीं. आणि शेवटीं तें छिद्र बंबाच्या आटोक्यांत येऊं लागलें. ह्यागोष्टीमुळें नवा भरंवसा येऊन आशा उत्पन्न झाली, व तेणें करून आणखी बळ आलें. बंब चालवायास लागून बाकी राहिलेलीं मनुष्यें नांगर वर ओढायास लागलीं. तेव्हां तें गलबत खडकापासून पलीकडे झालें. नंतर पुढील शेंड्याचा डोलखांब व पुढील परमानकाठीही उभी केली. आणि समुद्राकडून वाऱ्याची झुळूक येऊं लागली, ह्यास्तव गलबतावर आणखी एकवेळ शीड लाविलें व तें जमीनीकडेस जाण्याकरितां सिद्ध

केलें.

अशा गोष्टी अनुकूल होत्या तथापि सफरीलोकांचें संकट दूर झालें असें नाहीं. गलबताच्या तळास छिद्र होतें त्यांतून पाण्याचा लोट आंत येतच होता. ह्या प्रसंगीं एक चतुराईचा उपाय करून त्याची योजना केली. ती अशी, एक्या शिडाच्या वरील भागास जुन्या दोरांचा काथ्या, व लोंकर, हीं बरीच पुष्कळ, टांके मारून शिवून ठेविलीं होतीं, आणि आंत पाणी शिरूं नये अशा रीतीनें तीं तयार केलीं होतीं. ज्या चव्हाटांनीं तें शीड ताणून धरीत असत, त्या चव्हाटांनीं तें गलबताच्या तळाखालीं ओढून आणिलें. जेव्हां तें छिद्राखालीं आलें, तेव्हां आंत पाणी शिरत होतें त्या बरोबर त्या शिडावरची लोंकर व काथ्या हीं ओढिलीं गेलीं. असा हो उपाय सिद्ध झाल्यामुळें, पूर्वीं मनांत ज्या आशा उत्पन्न झाल्या होत्या त्या पूर्ण झाल्या; कारण तेणेंकरून तें छिद्र इतकें बुजलें कीं, तीनही पंपास जें जुमानीत नव्हतें, तें आतां एक्याच पंपानें ते आकळून धरिलें. सफर करणारे हळू हळू जमीनी जवळ जाऊन पोंचले, आणि ज्यून महिन्याच्या चवदाव्या तारिखेस दैवयोगानें त्यांस एक लहानसें बंदर सांपडलें, तें गलबताचें अवघ नीट करावयास, व पुढील जलप्रवास करावा जोगी जहाजाची नीट व्यवस्था व बंदोबस्त करावयास, फार चांगलें सोयकर होतें, ह्या बंदरांत ते मोठ्या प्रयासानें उतरले, आणि कांठावर लागलेच तंबू उभे करून सामान सुमान जमीनीवर उतरलें, व जहाजास इजा पोंचली होती ती नीट करण्या करितां होईल तितकी तयारी केली. इतकेंही करून ज्यून महिन्याच्या बाविसाव्या तारखे पर्यंत तें छिद्र तपासावयास अवसर सांपडला नाहीं. ज्या ठिकाणीं तें छिद्र पाहाण्यांत

आलें, त्या ठिकाणीं, चार तक्ते फोडून दगडांनीं आंतील लांकडापर्यंत देखिल वाट पाडली होती. हत्याराने पाडल्या प्रमाणें तें छिद्र गुळगुळीत झालें होतें.ज्या खडकावर जहाज लागलें होतें त्याचा एक मोठा तुकडा तळाच्या दुसऱ्या बाजूस लगटून राहिला होता, तो जेव्हां बाहेर काढिला तेव्हां एवढें मोठें भोंसकें पडलें कीं, चार बंबाच्या ठिकाणीं आठ बंब असते तरी तें जहाज बुडून गेलें असतें. परंतु ईश्वरीसूत्रामुळें अशी अद्भुत गोष्ट घडली तेणें करून, एंडेवर जहाज व त्यावरील मंडळी ह्यांचा सत्वर व अनिवारपणें नाश होऊन जाई, इतक्या जोरानें पाणी आंत शिरलें नाहीं.

हल्लींच्या ठिकाणीं जहाज येऊन पोंचल्यापासून, कामदार व खलाशी ह्यां पैकीं पुष्कळांस नाविक रक्तपित्त नामक रोगाचा उपद्रव झाला, परंतु मासे, भाजीपाला, व दुसरे ताजे खाण्याचे पदार्थ मिळाले ह्मणून बहुतेक लोकरच बरे झाले. खायाच्या पदार्थांमध्यें एक जलशक्ति ह्मणून शिंपेची जात पाहाण्यांत आली. त्याशिंपा एवढ्या मोठाल्या होत्या कीं, दोघां माणसांच्यानें एक शिंप खाववत नव्हती; तसीच एक्या दिवशीं तीन कांसवें धरलीं होतीं, तीं एकंदर आठशें पौंड वजन भरलीं ( पौंड ह्मणजे रतल )

जवळच्या प्रदेशांत रहाणारे चौघे इंडियन, एक्या होडग्यांत बसून जहाजाकडेस आले. ते नग्न व काळ्या रंगाचे होते, त्यांचे केंस काळे, पण लोंकरी प्रमाणें नव्हते; आणि ते रूपानेंही वाईट होते असें नाहीं, त्यांची दृष्टि चंचल, व दांत सरळ व पांढरे होते; त्यांचा शब्द मृदु व मंजुळ होता; व त्याची जीभ इतकी हलकी होती कीं, इंग्लिश लोक जे शब्द बोलत, त्यांतून पुष्कळ शब्दांचा उच्चार त्यांनीं सहज रीतीनें केला. त्यां पैकीं

तियेजण दुसऱ्यादिवशीं पुनः आले, तेव्हां त्यांजबरोबर चवथा एकजण नवाच होता त्यानें एक फार विलक्षण भूषण धारण केलें होतें. ह्मणजे दोहों नाक पुड्यांचा मधील पडद्यास भोंक पाडून त्यांतून सरासरीं बोटा इतकें जाड, व पांच सहा इंच लांब, असें एक्या पक्ष्याचें हाड ओंवलें होतें. आणखी चौकशी करितां असें समजलें कीं, ह्या सर्वलोकांच्या नाकाचा तोच भाग टोंचलेला आहे, व कानास भोंकें आहेत. केसांचे वळून केलेले दोरे ते आपल्या भुजेच्या वरील बाजूवर धारण करीत असतात.

ह्याच जवळच्या प्रदेशांत पुष्कळलोक रहात आहेत, असें पुरते पणीं निर्णीत झालें होतें. तथापि त्यांपैकीं पाहाण्यांत थोडेलोक आले. एक टोळी वारंवार जहाजावर येत असे, तेव्हां गलबताच्या मजल्यावर कितीएक कांसवें पाहून त्यांतून एक घ्यावें अशी तीस वासना झाली. परंतु त्या विषयीं परवानगी मिळेना; ह्मणून निराश होऊन त्यांनीं आपल्या होडींत उड्या टाकिल्या, आणि वल्हीं मारून कांठाकडेस गेले; तेथें राळेचा हांडा कढत होता, त्या खालून एक जळतें लांकूड ओढून घेऊन, सफरीलोकांच्या तंबूच्या ज्या आंगास वारा येत होता तिकडेस त्यांनीं गरका मारिला; आणि धांवत जात असतां त्यांनीं गवत पेटवून दिलें. तें गवत गव्हांच्या तुसा प्रमाणें शुष्क होतें, व पांच साहा फीट उंच होतें, तें आश्चर्य कारक कडाख्यानें जळालें. ब्यांक्ससाहेबाचा एक तंबू होता तो त्यानें लागलाच खालीं पाडून समुद्राच्या कांठावर नेवविला, नाहींतर तो जळून गेला असता. लोहाराच्या भट्टीच्या कारखान्यांपैकीं जितका भाग जळाया जोगा होता तितका जळून गेला. रानामध्यें अग्नि दूरपर्यंत पेटला, आणि सुमारें दोन मैल पर्यंत तीं

रानें लौकरच ज्वाळामय दिसूं लागलीं. आणि रात्रीं भोंवतालचे पुष्कळ मैलपर्यंत दूरचे डोंगर पेटलेले दिसत होते.

ही गोष्ट जर अंमळ अगोदर घडती, तर तीपासून मोठे भयंकर परिणाम झाले असते; कारण बंदुकीची दारू ह्यापूर्वी बहुतवेळ पर्यंत जहाजावर नेली नव्हती; आणि सामानाचा तंबू त्यांतील किंमतदार जिनसांकडून काढून थोडके तास झाले होते.

जहाजास इजा झाली होती, ती नीट केल्यावर कपतान कूक ह्यानें आपला जलप्रवास पुढें चालविण्याची सर्व सिद्धता केली. ज्या बंदरांत ह्या प्रकारें गलबत नीट केलें त्या बंदरास त्यानें एंडेवर रिवर असें नांव दिलें. आणि आगष्ट महिन्याच्या चवथ्या तारिखेस, मोठ्या प्रातःकाळीं, त्यानें आपलें जहाज हाकारिलें. एंडेवर रिवर नामक बंदरापासून उत्तरेकडील रस्त्यानें जात असतां तेथें रेती व खडक चोंहीकडे पसरलें होते, आणि मधून मधून मोठा तुफानाचा वारा लागत होता, ह्यामुळें त्यांस मोठे कष्ट पडले. ह्या घोंटाळ्याच्या नौकागमनांत त्यांचें काय काय वर्तमान घडलें त्याविषयींचा सविस्तर वृत्तांत लिहूं गेलों तर फारचवेळ लागेल. असो, ज्यांवर कोणाची कधीं तोड झाली नसेल असे अचूक तर्क व नौका गमन प्रकरणीं निपुणता; नसेच त्याचे सोबती ह्यांचा धिमेपणा, व दीर्घ प्रयत्न, हे खरोखर किर्त्ता घेण्या जोगे होते; ह्या गोष्टींच्या बळानें ते चाल-ले.

शेवटीं, सफर करणारे न्यूहालंड बेटाच्या उत्तरेकडील शेव-टास येऊन पोंचले; ह्याकांठाचा शोध कूकसाहेबानें शेंकडों मैल पर्यंत

केला, तेव्हां अडतिसांपासून साडे दहा दक्षिण अक्षांश पर्यंत, सर्व बंदरें, अखातें, नद्या, व त्या कांठीं जीं बेटें होतीं त्यांचा त्यानें तपास केला. त्याच्या पश्चिमेकडील बाजूस समुद्र मैदान होता. ह्मणून आपल्या जलप्रवासाचीं श्रमसंकटें आतां संपत आलीं असें त्यास वाटलें.

आगष्ट महिन्याच्या तेविसाव्या तारिखेस, तो **न्यूहालंड व न्यू गिनी** ह्यांच्या मधील सामुद्रधुनींत आला, आणि सेतेंबर महिन्याच्या तिसऱ्या तारिखेस सूर्योदया बराबर, त्या बेटापासून सुमारें तीन मैलांच्या आंतच त्यानें गलबत नांगरिलें. एक नाव पाण्यांत टाकिली, व गलबता वरील मंडळी पैकीं कितीएक चांगलीं हत्यारबंद माणसें बराबर घेऊन **कूकसाहेब** कांठावर गेला. तेथें त्यांनीं तीन आसामी तद्देशीय पाहिले. ते एकाएकीं रानांतून येऊन ह्यांच्या आंगावर तुटून पडले आणि आपले तीर मारून मोठ्या त्वरेनें पळून गेले. येथें स्नेहभावानें कांहीं एक गोष्ट व्हा याची नाहीं असें जाणून **कूकसाहेब** आपल्या सोबत्यांसुद्धां गलबतावर परत गेला.

युरोपास परत जातांना, लागलेंच **बाटेवियाबेटास** जावें असा बेत करून त्यानें पश्चिमेकडेस गलबत हाकारिलें. त्या काळीं, गलबतास भेगा पडून व दुसऱ्या प्रकारें तें खराब झालें होतें; तसेंच त्यास वाटलें कीं, ज्या समुद्रांत लोक गलबतांत बसून पूर्वीच फिरले, व जेथील कांठ्याचें यथास्थित वृत्त, **स्पेन व हालंड** येथील भूगोल वेत्यांनीं लिहून ठेविलें आहे, त्या समुद्रांत नवीन अगत्याच्या गोष्टीचा शोध लागणें हें दुरापास्त आहे, अशा प्रकरणांवरून तो ह्या गोष्टीस प्रवृत्त झाला. जल

प्रवासाच्या ह्या भागांत, न्यूहालंड व न्यूगिनी हीं दोन बेगळालीं बेटें आहेत ह्या गोष्टीचें स्थापन करण्याची मात्र कीर्ति प्राप्त व्हावी इतकीच लेफटेनेंटकूक ह्याची इच्छा होती.

अगठोबरच्या नवव्या तारिखेस, सफर करणारे बाटेविया शहरास येऊन पोंचले, हें जावा द्वीपांतील डच लोकांच्या संस्थानांतलें मुख्य शहर आहे हें प्रसिद्ध आहे. पुरी दागदोजीकेल्याविना जहाज युरोपास सुरक्षित जाणें अशक्य, असें जाणून हें काम बाटेविया येथें करण्याची कूकसाहेबानें परमाणगी घेतली. तसेंच ह्याकामास जें जें लागेल तें तें सढळपणानें मिळेल असेंही त्यास वचन मिळालें.

ट्यूपिआ व त्याचा मुलगा टेईटो ह्यांस समागमें घेऊन इंग्लिश गृहस्थ जमिनीवर उतरले. ट्यूपिआ हा बहुत दिवस पर्यंत अजारी पडला होता. व जेव्हां तो जहाज सोडून निघाला, तेव्हां देखिल तो पराकाष्ठेचा अशक्त व ग्लान झाला होता; परंतु गांवांत जातांच त्याच्या शरीरांत दुसरा जीव उत्पन्न झालासा दिसला. अगदीं नवे व अद्भुत असे चमत्कार पाहून तो चकभूल झाला. घरें, रथ, रस्ते, लोक व दुसरे बहुत पदार्थ एकदम त्याच्या दृष्टीस पडतांच, मंत्राच्या योगें जो परिणाम होतो असें ह्मणतात तोच त्यापासून झाला. ह्याच्याहीपेक्षां त्याचा मुलगा टेइटो ह्यानें आपणास झालेलें आश्चर्य व संतोष फार आनंदित होऊन दाखविला तो असा हर्षाच्या आवेशांत तो रस्त्यामधून नाचूं लागला व उत्कंठित होत्साता विश्रांति रहित अपूर्व दर्शनेच्छेकरून प्रत्येक पदार्थ लक्ष्य पूर्वक पहात होता, व त्याची अपूर्व दर्शनेच्छा प्रतिक्षणीं उत्पन्न होऊन

तृप्त होत होती. वागणाऱ्या लोकांचे परोपरीचे पेहेराव पाहून **ट्यूपिआ** ह्याचें चित्त विशेषें करून वेधलें गेलें. आणि, **बबेरिया** येथें प्रत्येक मनुष्य आपापल्या देशाचा पोषाख धारण करितो, असें जेव्हां त्यास कळलें तेव्हां, **ओटेहीट** बेटांतील पोषाख करून दृष्टीस पडावें अशी त्यानें आपली इच्छा प्रगट केली. त्यावरून दक्षिण समुद्रांतील कापड आणविलें; तेव्हां तें त्यानें मोठ्या त्वरेनें व कुशलतेनें धारण केलें.

सफर करणाऱ्यांस **बाटेविया** येथें येऊन नऊ दिवस मात्र झाले, इतक्यांत त्या हवेचे व जागेचे घातक गुण त्यांच्या अनुभवास येऊं लागले. ते असे, **ट्यूपिआ** ह्याचा पहिला हुशारीचा आवेश उतरल्यावर दिवसानुदिवस त्याची प्रकृति बिघडत चालली; **टेईटो** ह्याच्या **फुफ्फुसांत** दाह रोग उत्पन्न झाला; **ब्यांक्ससाहेब** व डाक्तर **सोलंडर** ह्यांस ताप येऊं लागला. व थोडक्या काळांत जहाजावरील व कांठावरील बहुतेक मनुष्यें दुखण्यास पडलीं. **बाटेविया** येथील कुंद हवेपेक्षां मोकळी हवा खावी, अशी **ट्यूपिआ** ह्यास इच्छा झाल्यावरून जवळच एक लहानसें बेट होतें त्यावर त्याजकरितां तंबू उभा केला होता तेथें तो **ब्यांक्ससाहेब** ह्याज बरोबर गेला. जहाजावरील शस्त्रवैद्य हा ज्ञाता व कुशल होता, तोच ह्या घातक हवेनें प्रथम बळी घेतला. **टेईटो** हा नवव्या तारिखेस मरण पावला, त्यावर **ट्यूपिआ** ह्याची बापाप्रमाणें प्रीति होती. त्यामुळें तो मेल्यावर हा बाकूंन.जाऊन त्याचे मागें लौकरच मेला. **ब्यांक्ससाहेब** व डाक्तर **सोलंडर**, ह्यांची दुखणीं इतकीं वाढलीं कीं, स्थलांतर केल्या खेरीज त्यांचा जीव बचावण्यास दुसरा उपाय नाहीं असें वैद्यानें सांगितलें. त्याप्रमाणें

गांवापासून सुमारें दोन मैलांवर त्याच्याकरितां भाड्यानें एक घर घेतलें; तेथें गेल्यावर त्यांची प्रकृति हळूहळू ताळ्यावर आली. शेवटीं **कूकसाहेब** ही अजारी पडला. त्याकाळीं, जहाजावरील सर्व मंडळी पैकीं, आपापलें काम चालवायास समर्थ, असे दहांपेक्षां अधिक नव्हते.

अशा विपत्तींच्या कचाटांत असतां **कूकसाहेब** हा आपल्या जहाजाची दागदोजी मेहनतीनें लक्ष्य पुरवून करीत होता. त्या जहाजाची इतकी खराबी झाली असेल असें वाटलें नव्हतें. अतिभयंकर समुद्रांतून हजारों मैल पर्यंत जहाजांत बसून फिरत असतां, सफर करणारे आपल्या भयंकर स्थितीविषयीं अज्ञान होते हें त्यांचें वास्तविक भाग्य होय; कारण मढविलेल्या तक्ष्यांस भोकें पाडून आंतील लांकडी कामापर्यंत देखिल किड्यांनीं प्रवेश केला होता, व जहाजाच्या तळाचा बराच भाग झिजून जाऊन जोड्याच्या तळापेक्षांही पातळ झाला होता; हें जर त्यांस समजलें असतें तर त्यांस फारच दुःख उत्पन्न झालें असतें. आणि बहुत समुद्र तीरें व देश ह्यांजविषयीं जें त्यांच्या जलप्रवासापासून फक्त प्रत्ययास आलें, त्याहून फार निराळें तें रचित झालें असतें.

जहाज नीट करणें, त्यावरील पाणी शिधासामग्री, आणि सामान, ह्यांचा सांठा पुरता करणें, नवे बंब उभे करणें, व दुसरीं जरूरीचीं अनेक कामें करणें, ह्यांत कमकसर तीन महिने लोटले. **ख्रिस्तमसूडे** ह्मणून ख्रिस्ती लोकांचा एक सण आहे त्यादिवशीं, **ब्याक्ससाहेब** वगैरे सर्व गृहस्थ ह्यां सहवर्तमान **लेफटेनेंटकूक** हा जहाजावर गेला; आणि दोन दिवसां नंतर ते समुद्रांत चालू झाले.

एंडेवर जहाज केप्आफ्गुड्होप् येथें जात असतां बाटेविया येथें जे रोग बीजरूपानें त्यांस प्राप्त झाले होते, त्यांची अतिभयंकर चिन्हें दिसूं लागलीं त्यांपासून सफरीलोकांस मोठी शोककारक स्थिति प्राप्त झाली. तें जहाज केवळ हासपितळच बनून राहिलें. त्यांत जे अजारी पडले होते त्यांचा चांगला समाचार घ्यावयास ज्यास इकडे तिकडे फिरतां येई असें कोणीं राहिलें नाही. रोगावर करवतील तितके उपाय केले, परंतु तो इतका भिनून गेला होता कीं, त्याचें निर्मूळ लौकर झालें नाहीं. त्यापासून इतका घात होऊं लागला कीं, दररात्रीं एक मडें समुद्रांत टाकून द्यावें लागत होतें. ज्योतिषी ग्रीनसाहेब, व स्थावर जंगम पदार्थांचीं चित्रें काढणारा पारकिन्सन् साहेब; होडक्या, सुनार, शीडवाला व दुसरे मिळून एकंदर तेवीस आसामी मरण पावले. हे अनर्थ कूकसाहेबाच्या मनास फारच लागले आणि निःसंशय त्याच कारणामुळें नावाडी लोकांच्या शरीर संपत्तीचें संरक्षण होण्याच्या उपायां कडेस त्याचे विचार वळले; व त्यानें त्याविषयीं जे उपाय योजिले ते पुढें त्यानें करून पहातां त्यांपासून बहुत विलक्षण गुण झाले, ते प्रसिद्ध आहेत.

मार्च महिन्याच्या पंधराव्या तारिखेस शुक्रवारीं, एंडेवर जहाज केप्आफ्गुडहोप् येथें येऊन पोंचलें; तेव्हां सर्व अजारी मनुष्यें लागलींच जमीनीवर उतरलीं; व त्यांस आरोग्य होण्याविषयींची होईल तितकी तजवीज ठेविली. जहाजाचीही आणखी कांहीं डागडोजी केली, व नवी सिधासामग्री, सर्पण, व पाणी, ह्यांचा पुरावा करून घेतला.

सरासरी एक्या महिन्यानें जहाज पुनः समुद्रांत चालाया जोगें तयार झालें. एप्रिल महिन्याच्या एकुणतिसाव्या तारिखेस सकाळीं सफर करणाऱ्यांनीं आपली प्रथम याम्योत्तर रेषा वोलांडिली, तेव्हां त्यांची भूगोला भोंवतीं समुद्रांतून प्रदक्षिणा झाली. दोनदिवसांनंतर ते सेंटहलीना येथें आले, तेथें तीन दिवस पर्यंत मुकाम करून नंतर इंग्लंड देशास चालते झाले.

जहाजाचे दोर व शिडें हीं आतां इतकीं खराब झालीं होतीं कीं, नेहमी कांहींना कांहीं गळून जाऊं लागलें, तथापि स्तुत्य सरदार, व त्याचे सोबती, हे मार्गानें सुरक्षितपणें चालले होते. सन १७७०च्या ज्यून महिन्याच्या अकराव्या तारिखेस ते सफर करणारे ब्रिटिश्-चालन नामक सामुद्र धुनींत आले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सहावाजतां त्यांनीं बियाची हेड हें टाकिलें, व त्याच रोजीं दुपारांवर डौन येथें गलबत नांगरून कूकसाहेब डील मुकामीं कांठावर आला.

त्या प्रकारें कूकसाहेबाचें पृथ्वी भोंवतीं प्रथम जलपर्यटन समाप्त झालें. ह्यांत त्यानें बहुत संकटें भोगिलीं, व बहुतदेश शोधून काढिले; आणि आपण मोठा बुद्धिमान व उद्योगी पुरुष आहें ह्याविषयींचीं त्यानें सुदृढ प्रमाणें दाखविलीं. यावत् भयंकर साहस कर्में करायास, तसेंच जहाजांत बसून फिरणें, व देश शोधून काढणें, ह्याविषयींचे अत्यंत धैर्याचे व अतिसफल होणारे असे प्रयत्न करायास तो पुरुष समर्थ होता.

यमुना,— गोपाळा, इंग्लिश देशांतून गेल्यास त्याला किती दिवस झाले होते?

गोपाळा —, बहुतकरून तीन वर्षे. इतक्या काळांत, कोलंबसाच्या वेळापासून त्याच्या हयाती पर्यंत, त्याच्या देशांत जितके नौकागमन कर्ते झाले, त्या सर्वांनीं जितके शोध लाविले होते, तितके ह्यानें एकट्यानें लाविले.

रामचंद्र —, हे शोध लाविल्यापासून, सरकारचा आश्रय व राजाची प्रीतिही प्राप्त होण्याविषयीं तो योग्य झाला हें यथार्थ आहे. त्याप्रमाणें पुढें लौकरच राजकीय अरमारांत सरदारीची पदवी देऊन त्यास वाढविलें. शुक्राच्या संक्रमणाचा वेध ज्या रीतीनें केला होता तिजवरून रायल् सोसैटीचे अध्यक्ष, व सभासद, ह्यांस ही परम संतोष झाला.

कृष्णाचार्य —, वेधापासून उत्पन्न झालेल्या शास्त्रोपयोगी ज्या सारभूत गोष्टी त्या, कूकसाहेब व ग्रीनसाहेब त्यांच्या शुक्र संक्रमण संबंधी कागदांवरून निवडून काढाव्या ह्मणून, ते कागद राजकीय ज्योतिषी डाक्तर म्यासूकेलिन् ह्याच्या स्वाधीन केले; तेव्हां त्याचें विस्तीर्णज्ञान व स्वस्थिर झालेले गुण, ह्यांस अनुरूप जी स्वयंत्रता व बुद्धि वैभव यांहीं करून त्यानें तें काम बजाविलें, असें आमच्या ऐकण्यांत आलें आहे.

रखमाबाई —, कूकसाहेबाच्या जलप्रवासाचा वृत्तांत स्वतां त्यानें, किंवा बरोबर जे गृहस्थ गेले होते त्यांतून एकानें ही लिहिला नाहीं, तेणेंकरून लोकांचा फार तोटा झाला असें मला वाटतें.

यमुना —, असें मलाही वाटतें; बरें पण मग तो कोणीं लिहिला?

आनंदराव —, कूकसाहेब, त्याचे कामदार, आणि ब्यांक्ससाहेब,

ह्यांच्या कागदांवरून डाकतर हाक्स्वर्थ ह्यानें तो लिहिला; मग तो ग्रंथ छापून प्रसिद्ध केला. त्या ग्रंथाची पद्धति, व त्याच्या रचनेची साधारण उत्कृष्टता, ह्यांच्या योगें जसा तो रसिकलोकांस आवडतो, तसा आंतील गोष्टींमुळें भूगोलवेत्ता, नाविक, अथवा भूसृष्टि नियमवेत्ता ह्यांच्या उपयोगीं नाहीं, असें ह्मणतात.

कृष्णाचार्य —, ईश्वराचे संकेत व स्वभाव ह्याविषयांवर त्यानें अविचारानें व फार अयोग्यपणानें कांहीं मतें लिहिलीं, त्यावरून त्या कालच्या ग्रंथकर्त्यांनीं त्याग्रंथाचा फारच तिरस्कार केला.

यमुना —, गोपाळानें कालजी गोष्ट वाचली, तिजमध्यें असें निघालें होतें कीं, जलप्रवास करणाऱ्यांनीं प्रथम जेव्हां न्यूझीलंडबेट पाहिलें, तेव्हां तें दक्षिणगोलार्धांतील एक्या महाद्वीपाचा विभाग आहे, असें त्यांस वाटलें, परंतु गोलावर किंवा नकाशावर त्या गोलार्धांत तें महाद्वीप लिहिलें नाहीं.

आनंदराव —, माझे लाडके, ती गोष्ट खरी; परंतु कूकसाहेबाच्या पूर्वीं सरासरी दोनशें वर्षांवर, दक्षिण गोलार्धाच्या अज्ञान भागांत आणखी एक महाद्वीप आहे असें प्रबळ मत होतें; व त्याच्या प्रतिपादनार्थ, अज्ञान जनास बरीं वाटायाजोगीं बहुत प्रमाणें दाखवीत, व पुष्कळ गोष्टी सांगत होते.

कृष्णाचार्य —, परंतु असल्या महाद्वीपाचा एक भाग न्यूहालंड हें आहे, असें समजत होते; पण, न्यूहालंड हें निःसंशय स्वतंत्र बेट आहे असें सिद्धकरून कपतानकूक ह्यानें त्याप्रमाणांपैकीं एकप्रमाण मागील

जलप्रवास समयींच रद्द केलें; तथापि, आजपर्यंत जे प्रदेश शोधून काढिले त्यांहून आणखी दक्षिणेस एक महाद्वीप आहे, ह्यामतास बुद्धिमान् व विद्वान् असे बहुत पुरुष अद्यापि अनुसरून होते. त्याजकरितां दक्षिण समुद्राच्या ज्या भागांत बहुधा तें असण्याविषयींचें अनुमान होत असे, त्या भागांत फिरण्या करितां मुद्दाम गलबतें पाठवून तें आहे किंवा नाहीं त्याचा निर्णय करावा ह्मणून ब्रिटिश सरकारानें निश्चय केला.

त्यांची तयारी कसकशी झाली त्याविषयींचा कचा मजकूर रामचंद्र सांगेल.

रामचंद्र —, सरकारानें दोन जहाजें खरेदी केलीं; तीं एंडेवर जहाजा प्रमाणेंच कोळशाच्या व्यापारांत कामास लावलेलीं होतीं; आणि ज्या पुरुषानें तें जहाज बांधिलें होतें त्याच पुरुषानें हीं जहाजें वास्तविक बांधिलीं होतीं. तीं निवडून घेण्याविषयीं व कामा करितां त्यांची तयारी करण्या विषयीं फार लक्ष्य पुरविलें होतें. त्यां मध्यें जें मोठें जहाज होतें, तें चारशेंबासष्ट टन् ओझ्यानें होतें. व त्याचें नांव रेसोल्यूशन् ह्मणजे निश्चय असें होतें. व दुसरें जहाज तीनशें छत्तीस टन् ओझ्यानें होतें, त्याचें नांव अडवेंचर ह्मणजे साहसी असें होतें. सन १७७१ च्या नोवेंबर महिन्यांत कपूतान कूक ह्यास मोठ्या जहाजाची सरदारी मिळाली; व सुमारें त्याच वेळेस टोबियाफर्नोक्स साहेब ह्यास दुसऱ्या जहाजाची सरदारी दिली. रेसोल्यूशन नामक जहाजावर माणसें व कामदार लोक मिळून एकंदर एकशें बारा आसाम्या होत्या, व अडवेंचर नामक

जहाजावर एक्यायशीं आसाम्या होत्या.त्या जहाजांची सिद्धता अगदीं पूर्ण केली होती, व जो जो अपूर्वपदार्थ जरूरीचा अथवा उपयोगी आहे असें स्फचलें, तो तो पदार्थ गलबतांवर भरला. अरमाराचा मुख्य सरदार लार्डस्यांड्विचू नामेंकरून होता, तो जहाजांची सर्व सिद्धता यथास्थित झाल्याविषयीं खातरीकरून घेण्याकरितां ह्या प्रसंगीं परम आस्थेनें वेळो-वेळीं जहाजें पाहावयास जात होता. उत्तमप्रकारची धान्यादि सामग्री जहाजांवर भरली; ह्याशिवाय, खलाशी लोकांची शरीरसंपत्ति सुरक्षित होण्यांच्या उपयोगी असे मानिलेले बहुत पदार्थ ही घेतले.

यमुना—, ह्या मोहिमेस विद्वान् गृहस्थ कोण कोणते गेले होते?

रामचंद्र—, ज्योतिषसंबंधी काम पाहाण्याकरितां वेल्स् व बेली ह्या साहेबांस नेमिलें होतें. जेजे देश दृष्टीसपडतील तेथील स्थावरजंगम पदार्थांच्या इतिहासाचा शोध लावून ते एकत्रकरण्याकडेस जान्रेन् होल्डसाहेब व त्याचा मुलगा ह्यांस नेमिलें; आणि लिहिलेल्या वर्ण नें करून जे पदार्थ ध्यानांत येण्यास अशक्य त्यापदार्थांची. चित्रें काढाया करितां, विलियम्हाजूसाहेब ह्मणून एक उत्तम नकाशे करणारा होता, त्याची नेमणूक केली.

कृष्णाचार्य—, सर्व गोष्टींची सिद्धता झाली तेव्हां, कपतान कूक ह्यास, कोण कोणतीं कामें करण्याबद्दलचा हुकूम मिळाला. ह्या विषयीं पाल्हाळ लिहीत नाहीं, परंतु इतकेंच सांगणें पुरे कीं, नौकागमनाच्या इतिहासांत प्रसिद्ध अशी जी देशसोधून काढण्याची फारच मोठी मसलत होती, तिजवर त्यास पाठविलें. सर्वपृथ्वीचे गोलाभोंवतीं जहाजांत

बसून प्रदक्षिणा घालावी इतकेंच नाहीं, तर अतिदक्षिण अक्षांशांकडेसही त्या गोला भोंवतीं प्रदक्षिणा करण्याचा त्यास हुकूम झाला; त्यांत अतिशयित धैर्यवान् व परमकुशल अशा नौकाध्यक्षांस ही जेथें जायाला सायास पडतात, अशा दक्षिण गोलार्धाच्या कोणाएक्या भागांत एक महाद्वीप आहे त्या विषयीं बरीच घाटाघाट झालेल्या शंकेचा निर्णय होई अशा रीतीनें पासिफिक् महासागरांतील पूर्वींच्या अज्ञात कोनांत वेळोवेळ फेऱ्या कराव्या, असें जाणविलें होतें.

एथें संभाषण समाप्त झालें. पृथ्वीभोंवतीं कपूतान् कूक ह्याचें दुसरें जलपर्यटन ह्याची गोष्ट रामचंद्रानें तयार केली होती, परंतु ती वाचण्याचें काम येत्या संध्याकाळापर्यंत बंद ठेविलें.



# सत्रावा संध्याकाळ.

आनंदरावाच्या सांगण्यावरून रामचंद्रानें खालीं लिहिल्या प्रमाणें वाचिलें.

## कपुतान् कूक ह्यानें पृथ्वीभोंवतें दुसरें जलपर्यटन केलें त्याची गोष्ट.

सन १७७२ तील ज्यून महिन्याच्या तेराव्या तारिखेस प्लीमोथ बंदरांतून रेसोल्यूशन् व अडवेंचर हीं दोनही जहाजें सफरीलोकांनीं हाकारिलीं. आणि मदीरा व सेंटजेगो व केप् आफ् गुड होप् येथें दारू, धान्यादि सामग्री, व दुसरा सरंजाम, ह्यांचा आणखी सांठा गलबतावर घेऊन ते लागलेच अतिदक्षिण अक्षांशांकडेस चालते झाले.

नोवेंबर महिन्याच्या प्रारंभाचे सुमारास त्या जहाजांस एकामागून एक असे वादळाचे प्रसंग प्राप्त झाले, त्यामुळें कपुतान कूक ह्यानें ज्या रस्त्यानें पूर्वीं जावयाचें योजिलें होतें त्या रस्त्याच्या किंचित् पूर्वेस तीं धकावत गेलीं; आणि उष्ण हवेची एकाएकीं थंड हवा झाल्यामुळें सफरी लोकांच्या जहाजांवरजीं मेंढरें, डुकरें, आणि हंस होते त्यांच्या मुख्य भागाचा दुर्दैवानें नाश झाला.

दिसेंबरच्या दहाव्या तारिखेस त्यांस पन्नास अंश व चाळीस कळा इतक्या दक्षिण अक्षांशांत बर्फाचीं मोठमोठालीं बेटें लागूं लागलीं. हवा धुक्याची झाली होती, व बर्फाचीं बेटें होतीं म्हणून कपुतान कूक ह्यास मोठ्या नजबिजीनें चालणें प्राप्त झालें. ह्यानंतर चारदिवसांनीं, खोलवर

बर्फाचें एक मोठें मैदान लागलें, त्यामुळें गलबतांची गति खुंटली. त्या मैदानाचा शेवट, पूर्व पश्चिम, आणि दक्षिण, ह्यांतून एकीकडेस ही दिसण्यांत आला नाहीं. अठराव्या तारिखेस तर ते बर्फांत अगदीं गढून गेले. त्यापासून सुटका होण्यास त्यांस थोडेसे आयास पडले. पृथ्वीच्या ह्या भागांत बहुधा हे भर उन्हाळ्याचे दिवस होते, तरी हवा इतकी तीव्र होती कीं थंडी मुळें माणसें नमरावीं ह्मणून होईल तितकी तजवीज ठेवणें जरूर झालें.

दक्षिणेकडेस बर्फांतून जातां येत नाहीं असें पाहून कपूतान कूक कांहींसा पश्चिमेकडेस जाऊन नंतर पूर्वेकडच्या आंगानें चालिला; तेव्हां वाऱ्याचा एक सोसाटा आला त्या बराबर समुद्राच्या लाटा अशा मोठाल्या उठल्या कीं, बर्फांमध्यें राहाणें हें त्या जहाजास संकटरूपी झालें; कांहीं यत्न केला तेव्हां तें त्यांतून मोकळें झालें; परंतु सुट्या तुकड्यांपासून त्यास मोठाले धक्के बहुत बसले; ह्यानंतरही हवा अझून धुकटच होती.

जानेवारीच्या सत्राव्या तारिखेस रविवारीं कपूतानकूक हा सदुसष्ट अंश व पंधरा कळा इतक्या दक्षिण अक्षांशांत जाऊन पोंचला, तेव्हां त्यास पुढें जाववेनासें झालें. कां कीं, ह्यावेळीं दक्षिणेकडेस पूर्वेपासून बहुतकरून पश्चिमेपर्यंत, सर्वप्रदेशांत बर्फ एकसारिखें जमून गेलें होतें, त्यांत कोठें खंड आहे असें अगदीं दृष्टीस आलें नाहीं; ह्मणून आतां दक्षिणेकडेसच जहाजें चालविणें हें ठीक नाहीं, असें कपतानकूक ह्यास वाटलें. ह्याचें विशेष कारण हें कीं, अर्धा उन्हाळा होऊन चुकला होता, आणि आतां त्या बर्फास पुरती प्रदक्षिणा घालण्याचें काम सुलभ आहे अशी आशा राहिली नव्हती.

ह्यास्तव ते सफर करणारे कितीएक अंशापर्यंत उत्तरेकडेस परत आले. व फेब्रुआरीच्या पहिल्या तारिखेस, ४८ अंश व ३० कळा इतके दक्षिण अक्षांश आणि ५८ अंश व ७ कळा इतके पूर्व रेखांश ह्यास्थळीं ते होते; तेथून ते पूर्वेकडील रस्त्यानें चालते झाले. आठव्या तारिखेस इशारती केल्या परंतु त्याचा जाब अडवेंचर जहाजावरून मिळाला नाहीं, त्यावरून तें जहाज दूर राहिलें असें कूकसाहेबास भय वाटूं लागलें. दोन दिवस पर्यंत तोफांचे बार करून व रात्रीं मोठा अग्नि पेटवून वाट पाहिली, तेव्हां वरील गोष्ट खरीच असें ठरलें. त्यावरून रेसोल्यूशान् जहाज जलप्रवासार्थ एकटेंच हाकारणें जरूर पडलें.

त्यानंतर थोड्या दिवसांनीं रेसोल्यूशान जहाजावरील कामदारांस नैर्ऋत्येकडे जमीन आहे असा भास झाला; परंतु त्या ठिकाणीं गेले तेव्हां ढगामुळें आपण फसलों असें त्यांस समजलें. तेविसाव्या तारिखेस रात्रीं वादळाची हवा झाली व दंव फार पडलें, ह्यामुळें चोंहींकडून जहाज संकटांत पडलें ह्मणून पुनः कांहींसें उत्तरेकडेस फिरणें जरूर झालें. तेव्हां तिकडे जातांना, बर्फाचे मोठे मोठे बहुत तुकडे जहाजास लागले. उत्तर गोलार्धांत तितक्याच अक्षांशांत जितकी थंडी असते तिजपेक्षां एथील थंडी फार कडक होती.

मार्गांत चालत असतां, आजपर्यंत पुनःपुनः प्रत्यय आल्यावरून कपतानकूक त्याची खात्री झाली कीं, पश्चिमनैर्ऋत्येच्या बाजूस आपल्या मागें जमीन राहिली नाहीं; तसेंच दक्षिणेकडच्या ह्या बाजूस साठ अक्षांशांत ही जमीन नाहीं. तो अनुभव घेतलेला नौकागमनकर्ता होता ह्मणून त्यास

जे प्रत्यय आले त्यांत तो फसला गेला नाहीं. ह्मणून, मार्च महिन्याच्या १७ व्या तारिखेस ५९ अंश व ७ कळा इतके दक्षिण अक्षांश, आणि १५६ अंश व ५१ कळा इतके पूर्वरेखांश, ह्यास्थळीं असतां, हे दूरचे अक्षांश सोडून अडवेंचर जहाजाचा शोध लावावा, आणि आपल्या लोकांस विसांवा द्यावा, ह्यास्तव न्यूझीलंड येथें जावयाचा कपूतान कूक ह्यानें निश्चय केला. त्याप्रमाणें तो मार्चाच्या पंचविसाव्या तारिखेस न्यूझीलंड बेटाच्या कांठाशीं जाऊन पोंचला. ह्याप्रकारें केप्‌ आफ्‌ गुडहोप्‌ सोडिल्यापासून, एकशें सत्रा दिवस पर्यंत समुद्रांत राहून, दहाहजार नऊशें ऐंशी मैल नौका गमन केलें, परंतु एकवेळही जमीन दृष्टीस पडली नाहीं.

एवढा मोठा जलप्रवास केला तेव्हां, नाविकरक्तपित्त ह्मणून दर्यावर्दी लोकांचा घात करणारा रोग आहे त्यापासून ह्या खलाशांतून बहुतांस उपद्रव झाला असेल असें वाटेल; परंतु तशी गोष्ट नव्हती; कारण कीं कपूतान कूक ह्यानें आपल्या लोकांत जेवण्याच्या पथ्यकारक रीति ह्याविषयीं, व जहाज स्वच्छ व हवाशीर ठेवणें ह्याविषयीं, इतकें लक्ष्य पुरविलें कीं, एका मनुष्यास मात्र त्या रोगानें फार बेजार केलें.

कपूतान कूक ज्या बंदरांत उतरला, त्यास त्यानें उस्कीबे ह्मणजे धूळी अखात असें नांव दिलें. येथें लाकडें पाणी व अनेक प्रकारचे खायाचे पदार्थ बहुत मिळतात, असें पाहून तो तेथें दीड महिन्यावर थोडासा राहिला. इतक्या वेळांत जहाज व त्याचे नाडे दोर वगैरे सरंजाम नीटकरून जवळच्या सर्व प्रदेशांची तपासणी केली; तसेंच, त्या स्थळाचे अक्षांश व रेखांश, होका यंत्राचें अंतर, व ओहोटी भरतीचा भेद, ह्यांविषयीं अनेकप्रकारचे विद्योपयोगी शोध केले.

थोडेसे तद्देशीयलोक सफरीलोकांस येऊन भेटले. आज पर्यंत जे सर्वसाधारण न्यूझीलंड येथील राहाणारे त्यांच्या पाहाण्यांत आले होते त्यांपेक्षां हे फार नम्र, व कह्यांत रहाण्याजोगे असे दिसले, परंतु त्यांची व ह्यांची जात, भाषा, बहुतेक चाली हीं एकच होतीं. ते इकडे तिकडे फिरूनच जन्म घालवीत असत; आणि ते थोडे होते तरीं एकचित्तता, किंवा मैत्री, हीच्या बंधानें त्यांचीं कुटुंबें परस्पर संबद्ध आहेत ह्याविषयींचीं चिन्हें दिसलीं नाहींत.

अडवेंचर जहाज क्वीनचार्लटसूसौंड ह्या सामुद्रधुनींत मिळेल ह्या आशेनें कप्तान कूक ह्यानें डस्कीये सोडिल्यावर तिकड-चाच रस्ता धरिला. मे महिन्याचे अर्धे अधिक दिवस लोटल्यावर तो त्या सामुद्रधुनीजवळ आला, तेव्हां अडवेंचर जहाज दृष्टीस पडलें, तें पाहून त्यास समाधान झालें. साडेतीन महिने पर्यंत वियोग होऊन शेवटीं ह्याप्रमाणें परस्पर गांठी पडल्या ह्मणून दोन्ही जहाजांवरील कामदार व खलाशी ह्यांस मनापासून हर्ष उत्पन्न झाला.

एकेताळीस व शेताळीस इतक्या दक्षिण अक्षांशांच्या मधील प्रदेश शोधावा असा आतां कप्तान कूक ह्यानें बेत केला. त्याप्रमाणें त्यानें होईल तितकी त्वरा करून जलप्रवासार्थ दोन्ही जहाजांची सिद्धता करावी ह्मणून हुकूम केला. इकडे क्वीनचार्लटसूसौंड नामक अखाताजवळ, त्यानें कितीएक लहान लहान वाडगीं करविलीं, त्यांत अनेक जातींच्या उपयोगी वनस्पतींचें बीं व शलगम, गाजरें, आणि बटाटे, ह्यांचे कंद लाविले. तीं सर्व आसपास रहाणाऱ्या लोकांच्या फार उपयोगीं पडतील असें त्यांस

वाटलें. एक मेंढा व एक मेंढी, एक बकरा व एक बकरी, एक डुकर आणि दोन डुकरणी, अशीं तेथें सोडिलीं, त्यांपासून थोड्याच वर्षांत तेथें त्यांची बहुत संतति वाढेल असें त्यास वाटलें. भर हिंवाळ्यांत दक्षिणेस शेंकडो बीस अक्षांश पर्यंत शोधार्थ जाणें हा कूकसाहेबाचा बेत अद्भुत होय, असें कोणाएकास वाटेल ह्मणून, असें करण्याचें प्रयोजन त्यानें लिहून ठेविलें आहे; तें असें; "देशशोधून काढायास हिंवाळा हा कोण त्याही प्रकारें उपयोगी नाहीं हें मी कबूल करितों; परंतु आपण जें काम पतकरिलें तें कमी करण्या करितां त्याकाळांत देखिल कांहीं तरी झालें पाहिजे असें मला अवश्य वाटलें, नाहींतर पासिफिक् सागराच्या दक्षिण भागाची तपासणी पुढील उन्हाळ्यांत माझ्यानें पुरी झाली नसती. ह्या खेरीज, पूर्वेकडेस जातांना जर मार्गांत एखादी जमीन आढळली तर ऋतु अनुकूळ होतांच तिची पाहणी करण्याला आरंभ करण्यास, असें केल्यानें सिद्धता होती." ह्याप्रकारें करून आपल्या जलपर्यटनाचे उद्देश पार पाडण्याविषयीं ह्याविख्यात नौकाध्यक्षाची उत्कंठा होती; अशाप्रसंगीं बहुतेक पुरुषांस मागला पुढला विचार फार करावा लागतो.

ज्यून महिन्याच्या सातव्या तारिखेस रेसोल्यूशान व अडवेंचर हीं दोनही जहाजें क्वीन्चार्लटस्सौंड एथून निघालीं; तीं सुमारें दोन महिने पर्यंत पूर्वेकडेस चालली; तेव्हां अडवेंचर जहाजा वरील खलाशी इतके दुखणाईत पडले कीं, जेथें विसांवा मिळेल अशा ठिका णाचा शोध, होईल तितक्या जलदीनें करून तेथें आणें जरूर झालें. ह्मणून मुळीं दक्षिणेकडेस महाद्वीप सांपडायाचें नाहीं, त्यांवविशेषेंकरून सांप्रत

काळीं तर नाहींच नाहीं. अशी त्याविषयींची अगदीं आशा सोडून कपूतान कुक ह्यानें आपल्या पहिल्या प्रदेशाच्याही उत्तरेस जाण्याचा बेत केला. दक्षिण अक्षांश सत्रा, व एकशें बेताळीस पश्चिम रेखांश, ह्यांचे जवळ त्यास चार बेटें लागलीं; त्यांस त्यानें रेझोल्यूशनबेट, डोटफुलबेट, फर्नोक्सबेट, आणि अडवेंचरबेट, अशीं नांवें दिलीं. आगष्ट महिन्याच्या पंधराव्या तारिखेस मोठ्या सकाळीं तीं जहाजें अस्नेबर्ग नामें बेटापासून दृष्टीच्या टप्यांत आलीं; ह्या बेटाचा शोध पूर्वीं कपूतान वालिस ह्यानें लाविला होता. नंतर त्याच दिवशीं संध्याकाळचे सहा वाजतां जहाजांच्या पश्चिमेस ओटेहीटबेट दिसूं लागलें; तेव्हां ते तेथें गेले आणि आएटीपिया ह्या नांवाच्या अखातांत सुरक्षित पणें नांगर टाकण्या करितां जहाजें आणीत होते इतक्यांत, पोंवळ्यांच्या खडकावर आपटून फुटायाची पाळी आली होती; पण थोडक्यानें चुकली.

नंतर लोकरच त्याच्या भोंवतीं तद्देशीय लोकांची दाटी झाली; त्यांनीं नारळ, सोनकेळीं, अंजीरें व परोपरीचे कंद, आणिले होते, ते देऊन त्यांबद्दल खिळे व पोत हीं घेतलीं. डुकरें, व कोंबडीं हीं देण्याचा त्यांनीं करार केला, परंतु पाणी, व कंदमूळ, व फळें, ह्यां खेरीज इंग्लिशांस कांहीं प्राप्त झालें नाहीं. आह्मी मुख्य अधिकारी असें जे ह्मणवीत होते त्यांस कपूतान कूक ह्यानें आंतले आंगरखे, फरशा, व दुसरे पदार्थ, ह्यांची भेट केली. परंतु ते व त्यांचे सोबती इतके चोरीचे मसलतींत होते कीं, शेवटीं त्यासर्वांस जहाजा बाहेर काढून दिलें; परंतु कांहीं तासां नंतर त्यांचा व ह्यांचा जम बसून मित्रपणाचा व्यवहार पुनः चालू झाला.

आतां जहाजावर जे लोक आले होते त्यांतून बहुतेकांनीं कप्तान कूक ह्यास पुनः वळखिलें व त्यांपैकीं बहुतांनी ब्यांक्ससाहेब व दुसरे जे कपूतानकूक ह्याजबराबर पूर्वींच्या जलप्रवास समयीं आले होते, त्यांजविषयीं उत्कंठेनें विचारिलें.

मागील प्रवास झाल्यापासून त्या देशांत पुष्कळ व मोठाल्या अशा उलटापालटी झाल्या. त्या अशा, त्या बेटांत दोन राज्यें होतीं त्यांकडून त्याचे दोन भाग झाले होते. त्या दोनही राज्यांतील लोकांमध्यें लढाई होऊन तींत इंग्लिशांचे मुख्य मुख्य स्नेही पडले. आबारिया त्या नामें करून एक प्रख्यात स्त्री होती, तिनें कपूतान वालिस जेव्हां ओटेहीट येथें होता; तसेंच हल्लींचे सफर करणारे मागें येथें होते, तेव्हां फार उत्तम वर्तणूक केली होती. ती स्त्री तेव्हांपेक्षां आतां फार गरीब अवस्थेंत होती. बेटाच्या मध्यभागीं ती रहात होती. तिचें स्वरूपच वाईट होऊन पालटलें होतें असें नाहीं, तर ती दरिद्री होऊन तिजपाशीं पहिलें महत्व किंवा अधिकार हें कांहींच राहिलें नव्हतें.

आगष्ट महिन्याच्या चोविसाव्या तारिखेस जहाजें चालतीं झालीं. तीं दुसऱ्यादिवशीं संध्याकाळीं माटेवाई नामक अखातांत येऊन पोंचलीं. जहाजें नांगरणार तों पूर्वींच त्यांच्या मजल्यावर तद्देशीय लोकांची दाटी झाली, त्यांतून बहुतांस कपूतानकूक ह्यानें वळखिलें व बहुतेकांनीं त्यांची चांगली आठवण ठेविली होती. समुद्राच्या कांठावर लोकांचा मोठा मेळा जमला होता, त्यामध्यें ओटू ह्या नामेंकरून त्या बेटाचा राजा होता त्याचें अपरी ह्या नामेंकरून रहायाचें ठिकाण होतें तेथें जाऊन

कपूतानकूक ह्यानें दुसऱ्या दिवशीं त्याची भेट घेतली. तेव्हां तो राजा चांगला, रूपवान्, पुष्ट, सहा फूट उंचीचा, व सरासरी तीस वर्षांच्या वयाचा, असा त्यानें पाहिला, परंतु त्याच्या रूपा प्रमाणें त्याचे गुण नव्हते, कारण त्याच्या सर्व कृतींत त्याचा बेकूबपणा व भ्याडपणा पराकाष्ठेचा दिसून आला.

ह्यावेळीं ओटेहीटबेट येथें जहाजाचा मुकाम होता. तेवढ्यांत कांहीं विशेष गोष्ट घडली नाहीं. व आजारीलोक बरे होतांच व जहाजांची जरूरीची डागडोजी होतांच विलंब नकरितां, कपूतानकूक ह्यानें पुनः चालतें होण्याचा विचार केला, व त्याप्रमाणें सप्तेंबरच्या पहिल्या तारिखेस संध्याकाळीं तो तेथून निघाला.

ओटेहीटबेटाहून निघून त्यानें हाहीनबेटाचा रस्ता धरिला. तेथें तो दुसऱ्या दिवशीं जाऊन पोंचला, परंतु बंदरांत शिरतांना अडवेंचर जहाज कांठावर चढलें, तेव्हां ताबडतोब चांगली मदत केली नसती तर तें फुटून गेलें असतें. दोनही जहाजें सुरक्षित होतांच, अडवेंचर जहाजाचा सरदार नामें कपूतान फर्नाक्स् ह्यास बरोबर घेऊन कपूतानकूक हा बेटावर उतरला, तेथील लोकांनीं त्यांची भेट मोठ्या स्नेह भावानें घेतली, आणि व्यापार लागलाच सुरू झाला, त्यावरून ताजें डुकराचें मांस, व कोंबडी, हीं आपणास येथें पुष्कळ मिळतील असा त्या सफर करणाऱ्यांस चांगला भरवंसा आला. हे पदार्थ त्या स्थितींतील लोकांस ह्मटलें ह्मणजे फार उत्तम लाभच होय.

कपूतानकूक ह्याचा जुना मित्र ओरी ह्यानामें करून त्या

बेटाचा राजा होता, तो त्यास येऊन भेटला; त्यानें कपूतान कूक ह्याची पुनः भेट झाली ह्मणून अतिसंतोष दाखविला. ओरी ह्यानें आपल्या बराबर एक डुकर, व कापडाचा बराच जथा, हें भेट ह्मणून आणिलें होतें. जें जें इंग्लिशांश लागेल तें तें मिळेल ह्मणून त्यानें वचन दिलें, आणि दररोज कामदारास खाण्या करितां ताजीं शिजवलेलीं फळें व मुळें हीं पुष्कळ पाठ-वीत होता. त्या बेटांतील कांहीं मनुष्यांनीं इंग्लिशां बराबर दगलबाजीची वर्त-णूक केली; परंतु ओरी ह्यानें त्यांस पकडून, कितीएक जिनसा चोरीस गेल्या होत्या त्या परत देविल्या. शिक्षा करण्याकरितां त्या मनुष्यांस कपूतानकूक ह्याच्या हवालीं करूं लागला; परंतु कूकसाहेबानें त्यांच्या धन्यापासूनच त्यांस शिक्षा व्हावी ह्मणून शाहाणपणानें स्वतः शिक्षा केली नाहीं. कूकसाहे-बानें त्याच्या विश्वासूपणा करितां त्यास बहुत देणग्या दिल्या.

हाहीनबेटांत कपतानफर्नोक्स ह्यानें युलीटिआ येथें रहाणाऱ्या ओमाई ह्यानावाच्या एक्या तरुण मनुष्यास आपल्या जहाजावर घेतलें; ह्या मनुष्याविषयीं आह्मांकडे बरेंच ठाऊक झालें आहे व लिहिलें आहे. हा मनुष्य सोसेटी बेटांतील लोकांचा बराबर नमुना नाहीं, असा विचार करून कपूतानकूक ह्यानें प्रथम ती गोष्ट नापसंत केली; कां कीं, कुलीनता व प्रतिष्ठा ह्याविषयीं तो तेथील बहुतेकांपेक्षां कमती होता, तसें आकार, स्वरूप, किंवा रंग ह्यांविषयीं तो कांहीं विशेष उपयोगी पडेल असा नव्हता, परंतु इंग्लंडास जातांना, सफरीलोकां बराबर ओमाई हा अ त्यामुळें कप्तान कूक ह्यास पुढें फार संतोष झाला.

हाहीन बेटांत कांहीं दिवस पर्यंत जहाजांचा मुकाम होता, तितक्या वेळांत सरंजामाचा पुरावा मिळण्याविषयीं त्यांचा उपोग फारच सफळ झाला. तीनशें डुकरें, खेरीज कोंबडीं, आणि फळें, हीं पैदा झालीं, व तेथें जहाजें आ-णखी राहिलीं असतीं तर, ह्या पदार्थांची फार भरती झाली असती.

हाहीन बेटाहून सफरीलोक युलीटिआ येथें जायास निघाले. तेथें कपूतान कूक व त्या बेटाचा नाईक, ह्यांमध्यें फार मित्रपणाचा व्यवहार चालू झाला. परंतु थोडा काळपर्यंत जहाजें तेथें होतीं तितक्यांत तेथील लोकांबराबर एक गोष्ट घडली; ती अशी, अडवेंचर जहाजावरील दोघे खलाशी हुकुमा विरुद्ध सर्व रात्रभर कांठावर राहिले, ह्यामुळें पूर्वीं जें सौरस्य चाललें होतें त्यांत थोडावेळ पर्यंत अंतर पडलें, परंतु पुनः लौकरच तें जसेंचे तसें झालें,

सफर करणाऱ्यांस खायाचे पदार्थ वगैरे सरंजाम हाहीन बेटांत जसा मिळाला, तसाच युलीटिआ येथेंही मिळाला. त्यांस तेथें जीं डुकरें मिळालीं तीं चारशें किंबहुना चारशां पेक्षां अधिक होतीं, असा कपूतान कूक ह्यानें अजमास केला. जहाजांत मावेनात इतकीं तीं वास्तविक मिळालीं होतीं ह्यामुळें सफरीलोकांस पुष्कळ फायदा व सुख होऊन ते पुढें चालू होण्यास समर्थ झाले.

कपूतान कूक सोसैटीबेटांस दुसऱ्यानें आला तेणेंकरून त्यास त्यांच्या साधारणस्थितीची व तेथीललोकांच्या रीतीभांतींची आणखी माहितगारी झाली. तसेंच त्या बेटांच्या भूगोलविद्येचें ज्ञान त्यास पूर्वीं होतें त्या पेक्षां हल्लीं बिनचूक प्राप्त झालें.

सप्टेंबरच्या सत्राव्या तारिखेस त्यानें युलीटिआ येथून जहाज हाकारिलें आणि दक्षिणेकडच्या आंगानें पश्चिमेचा रस्ता धरिला. तेविसाव्या तारिखेस जमीन दृष्टीस पडली, तीस त्यानें हार्वेस्तबेट असें नांव दिलें. अक्टोबरच्या पहिल्या तारिखेस तो मिडलबर्ग बेटास जाऊन पोंचला. तेथें जमीनीवर उतरायाच्या जागेचा शोध करीत आहे इतक्यांत, प्रत्येकीं तीन चार मनुष्यें चालवीत होतीं अशा दोन होड्या धीटपणानें जहाजाच्या बाजूशीं आल्या, आणि त्यांतील कांहीं लोक कांकू नकरितां जहाजावर चढले. हें विश्वासाचें चिन्ह पाहून, कूकसाहेबास तेलोक इतके चांगले वाटले कीं, झाली तर त्यांची भेट घ्यावी असा त्यानें बेत केला; हें काम त्यानें दुसऱ्या दिवशीं केलें. गलबतें नांगरिताहेत तों पूर्वीच होड्यांचा मोठा समुदाय त्यांच्या भोंवता मिळाला. त्या होड्या तद्देशीय लोकांनीं भरल्या होत्या. त्या लोकांनीं कापड व दुसरे परोपरीचे पदार्थ बराबर आणिले होते, ते देऊन त्यांनीं त्यांबद्दल खिळे व त्यांच्या मनास बरे वाटले ते पदार्थ घेतले. जहाजावर जे आले होते त्यांत टिऊनी ह्या नांवाचा तेथील एक नाईक होता, त्यास मुख्यत्वें करून एक कुऱ्हाड व कांहीं अणीदार खिळे त्यांनीं भेट देऊन लागलीच त्याची मर्जी संपादिली. कप्तानकूक हताखालीं सफर करणाऱ्यांची एक टोळी घेऊन दोन नावांत बसून कांठाशीं आला. तों तेथें लोकांचा मोठा घोळका जमला होता तो दृष्टीस पडला. त्यानें मोठ्यानें ललकारी करीत त्यांस सत्कार पूर्वक बेटांत नेलें. काठी किंवा दुसरें हत्यार एक्याही मनुष्याच्या हातांत नव्हतें, इतके ते स्वभावानें गरीब होते. घेण्यापेक्षां देण्याविषयीं ते फार उत्सुक दिसले. त्यांतून बहुतांस नावांच्या

जवळ येववलें नाहीं, ह्मणून त्यांनीं दुसऱ्यांच्या डोक्यांवरून कापडाचे सगळाले गठ्ठे झोंकिले, आणि त्यां बद्दल कांहीं जिन्नस परत मागणें किंवा त्यांची वाट पाहाणें, हें नकरितां ते परत गेले. तो सगळा दिवस सफरकरणाऱ्यांनीं फार आनंदानें घालविला. संध्याकाळीं ते जहाजावर परत आले तेव्हां, तो देश, व तेथील राहाणाऱ्यांची फार उपकारक वर्तणूक, ह्यांच्या योगानें आपणास किती संतोष वाटला, तो प्रत्येकानें सांगितला. परकीयांस सुख व्हावें ह्मणून यत्न करण्यास ते लोक एकमेकांची इर्ष्या करीत होतेसे दिसले. पराकाष्ठेच्या शुद्ध सुशीलपणामुळेंच ही सर्व वर्तणूक झाली, ह्यांत त्यांनीं कांहीं फारसा विचारकरून केलें असें दिसून आलें नाहीं; कारण कीं, **कपूतानकूक** ह्यानें तें बेट सोडून जाण्याचा आपला बेत त्या **नाइकास** कळविला तेव्हां त्याच्या मनास कांहीं विकार झाला नाहीं. **कप्तानकूक** ह्यानें **टिऊनी** ह्यास जे पदार्थ नजर केले त्यांत एक्या जातीचें बागेंत पेरायाचें बीं दिलें, तें असें होतें कीं, त्याची नीट व्यवस्था केली तर त्यापासून पुढें त्या देशास फार उपयोग व्हावयाचा.

**मिडलबर्ग** येथून जहाजें **आमूस्तर्डम** येथें गेलीं. तेथें बहुत गाजरें, व नारळ, तशींच कितीएक कोंबडीं व डुकरांचीं पोरें, हीं मिळालीं. तीं सर्व लहान लहान खिळे व कापडाचे तुकडे ह्यां बद्दल तेथीललोकांनीं दिलीं. एक कोंबडें अथवा डुकराचें पोर हें विकत घ्यावयास थोड्याशा जुन्या चिंध्या देखिल पुरत होत्या. तेथें शेतकीची उंच स्थिति, व सुंदरपणा पाहून **कपूतान कूक** ह्यास फार आश्चर्य वाटलें, व युरोपांतील फार सुपीक मैदानांतच मी आलों असी देखिल त्यास कल्पना करितां आली असती.

चोहीं कडील रचना रमणीय होती. स्वतःसिद्ध पदार्थास थोड्या हस्त कौशल्याच्या योगानें जशी ह्या बेटांत शोभा येते तिजपेक्षां अधिक शोभा दुसऱ्या कोठें येत नाहीं.

अमूस्तर्डम येथील लोक, स्नेहानें वागणारे होते; परंतु दक्षिण सागरांतील बेटांत जो भामटेपणाचा स्वभाव वारंवार पहाण्यांत आला, तो त्यांच्यांत अगदीं नव्हता असें नाहीं, तथापि ह्या जातीच्या ज्या गोष्टी घडल्या त्यांपासून कांहीं फारशी दगदग पडली, किंवा त्या लोकांबराबर सफरी लोकांचा कांहीं तंटा झाला, असें नाहीं.

कपूतान कूक ह्यानें त्या बेटांतील राजाची भेट घेतली तेव्हां एक आश्चर्यकारक प्रकार, दृष्टीस पडला, तो असा; तो राजा इतका दुर्मुखलेला व मैंद होऊन गंभीरपणानें बसला होता कीं, तो कोणी गव्हार मनुष्य आहे असें कपूतानास वाटलें. कांहीं देवभोळेपणाच्या कारणावरून इंडियन लोक त्याची पुजा करायास सिद्ध होते. त्यास सलाम करून जेव्हां कपूतान त्याशीं बोलूं लागला, तेव्हां त्यानें त्यास उत्तर केलें नाहीं, व त्या कडेस लक्ष्यही दिलें नाहीं; त्याची मुखचर्या किंचित् ही पालटली नाहीं. जे त्यास नजराणे दिले त्यांच्या योगानें देखिल तो आपला गंभीरपणा सोडून एकादा शब्द बोलायास, अथवा उजवेकडे किंवा डावेकडे डोचकें फिरवायास प्रवृत्त झाला नाहीं. तो भरज्वानींत होता, त्यामुळें आपल्या महत्वा विषयीं. मिथ्या विचार मनांत आल्यावरून इतकी इभ्रत पडाया सारिखें स्वरूप त्यानें धारण केलें असेल.

अमूस्तर्डम येथील रहाणारे कांहींसे तांब्याच्या रंगाचे होते;

परंतु त्यांची आकृति सुंदर व तोंडवळे रेखलेले होते. ते उद्योगी, आनंदी, व हुशार अशा जातीचे होते. विशेषेंकरून बायका पराकाष्ठेच्या होशी होत्या, तसे कोणी प्राणी कपूतान ह्याच्या पहाण्यांत आले नव्हते. गोड गाणी गाऊन त्यांनीं सफरीलोकांस बहुतवेळां खुष केलें. तेव्हां तालधरल्या प्रमाणें सर्वकाळ त्या बोटांनीं चुटक्या वाजवीत असत.

आकटोबरच्या सातव्या तारिखेस कपूतान कूक जलप्रवासार्थ पुढें चालता झाला. न्यूझीलंड बेटांत लांकडें व पाणी जहाजावर घेण्या करितां थेट क्वीनचार्लट्स सौंड नामक अखातास जाऊन नंतर दक्षिणेस आणि पश्चिमेस शोधार्थ जावें असा त्याचा बेत होता. नोवेंबरच्या तिसऱ्या तारिखे पर्यंत रेसोल्यूशान जहाज ह्या बंदरास जाऊन पोंचलें नाहीं. पूर्वीं बहुत दिवस पर्यंत वादळाच्या हवेमुळें तें इकडे तिकडे धक्के खात फिरत होतें; आणि अठ्ठताळीस तासपर्यंत जें एक मोठें तुफान झालें त्यांत अडवेंचर जहाजाचें अंतर पडलें, तें ह्यापुढें जलपर्यटन संपे पर्यंत दृष्टीस पडलें नाहीं.

क्वीनचार्लट्ससौंड येथें आल्यावर, तुफानामुळें, अनेक प्रकारें जहाज खराब झालें होतें त्याच्या डागडोजीची तयारी करण्याकडेस पहिल्यानें त्यानें लक्ष्य लाविलें. खायाचे पदार्थ व विशेषें करून भाकरी ह्यांची काय दशा होती, तिची चौकशी करणेंही जरूर होतें. सर्व पिपें उघडावीं आणि भाकरी निवडून काढून, जे तुकडे भाजले असतां नीट होण्यासारिखे असतील ते, ज्या जहाजावर तांब्याचा तवा होता त्यावर पुनः भाजावे, असा त्यानें हुकूम दिला. इतकी तजवीज केली तरी चार हजार दोनशें ब्याण्णव

पौंड वजन भाकरी अगदीं कामांतून गेल्या. जलप्रवासाच्या मागील भागांत न्यूझीलंड बेटांत जीं जनावरें सोडिलीं होतीं त्यांचा शोध कपूतान कूक ह्यानें अगोदर केला. तेव्हां त्यांपैकीं बहुतेक मारून टाकिलीं असें खचीत समजल्यामुळें त्यास वाईट वाटलें. ह्याप्रमाणें, ज्यांच्या कार्यार्थ तो उत्कंठित होता त्याच लोकांनीं उपयोगी जनावरें त्या देशांत पुष्कळ व्हावीं ह्याविषयींचे त्याचे उपकारक प्रयत्न निष्फळ करून टाकिले. जनावरांपेक्षां बागांची स्थिती बरी होती. त्यांत त्यानें जे पदार्थ पेरिले होते किंवा लाविले होते, त्यांपैकीं बहुतेकांची स्थिती चांगली होती. न्यूझीलंड बेटांतील लोकांनीं इतकी हयगय व मूर्खपणा केला तरी कपूतान कूक ह्यानें त्यांचें हित करण्याविषयींची आस्था सोडिली नाहीं. त्यानें तेथील कांहीं नाइकास एक डुकर, एक लहान डुकरीण, दोन कोंबडे व दोन कोंबड्या असें दिलें; आणि तीन डुकरिणी व एक डुकर, दोन कोंबडे व दोन कोंबड्या, अशीं तेथील रानांत सोडून देण्याचा हुकूम केला.

क्वीनचार्लट्‌ससौंड येथें सफरी लोकांचा मुक्काम होता, तोंपर्यंत शाकभाज्या व मासे ह्यांची त्यांस पुष्कळ बरकत मिळाली. आणि कप्तान ह्यानें आपल्या लोकांच्या खाण्याच्या पदार्थांविषयीं लक्ष्य पुरविलें, त्यामुळें जहाजावर ह्यासमयीं एकही मनुष्य आजारी पडलें नाहीं. दक्षिणेकडच्या बाजूनें दक्षिण महाद्वीपाचा अद्यापि शोध करीत न्यूझीलंड येथें जाण्याकरितां नोवेंबरच्या सविसाव्या तारिखेस त्यानें गलबत हाकारिलें. ह्यानंतर थोड्या दिवसांनीं लंडन नगरांतील मित्रांच्या पायां समोर आपले पाय आहेत अशी त्यांनीं अटकळ केली; डिसेंबरच्या बाराव्या तारिखेस बर्फाचें

पाहिलें बेट त्यांनीं पाहिलें, आणि पुढें जात असतां, सदुसष्ट अंश पांच कळा इतक्या दक्षिण अक्षांशांत बर्फाचे मोठमोठाले गोळे तसेच लहान लहान रूळ्या तुकड्यांचा जथा, ह्यांकडून जहाज वेढून गेलें, ह्यामुळें पुढें गलबत चालविणें हें काम मोठें जिगजिगीचें व संकटाचें झालें. ह्याजकरितां त्या बर्फांतून मोकळें व्हावें ह्मणून उत्तरेकडचा रस्ता धरणें अवश्य पडलें. चोविसाव्या तारिखेस बर्फाचीं बेटें सरासरी शंभर, भोंवतीं त्यांच्या नजरेस पडलीं. पण दैवयोगानें हवा चांगली होती, आणि अतिदक्षिण अक्षांशामुळें सर्व काळ सूर्याचा प्रकाश होता. पुढें जाण्या जोगें बर्फ होतांच **कपूतान कूक** ह्यानें पुनः दक्षिणेकडचा रस्ता धरिला. आणि सन १७७४ ांतील जानेवारीच्या तिसऱ्या तारिखेस दक्षिण ध्रुववृत्त टाकून तो दक्षिण अक्षांशांच्या एकाहत्तराव्या अंशा पर्यंत जाऊन ठेपला. ह्यापुढें तो जाता तर त्याच्या मूर्खपणाची सीमा झाली असती. पुढें गेल्यानें तो व त्याचीं मनुष्यें व त्यांचें जहाज, हीं परमावधीच्या संकटांत सांपडलीं, किंबहुना हित साधून घेण्याची आशा अगदीं न राहतां त्यांचा नाश झाला असता. **कपूतान कूक** ह्याचें व जहाजावरील बहुतेक गृहस्थांचें ही वास्तविक असेंच मत होतें कीं, आतां जें बर्फ दिसतें आहे तें थेट ध्रुवा पर्यंत पसरलें आहे; अथवा कांहीं जमीन असली तरी तिजला तें पूर्वीपासून लटकून बसलें असेल, परंतु अशी जमीन असली तरी ती सर्व चोंहीं कडून बर्फानें अवश्य भरलेली असेल. तेव्हां पक्षी किंवा इतर जनावरें, ह्यांस राहण्याविषयीं, बर्फ व ती जमीन हीं दोन्ही सारखींच होतीं. पूर्वी जेथ पर्यंत कोणी कोणी गेले होते त्यांजपेक्षां पुढें जावें इतकेंच नव्हे तर मनुष्याच्यानें जावेल तों पर्यंत जावें, अशी जरी **कपूतान कूक**

ह्यांस उत्कंठा होती, तथापि त्यास आतां जें प्रतिबंधक प्राप्त झालें त्यामुळें तो फारसा खिन्न झाला नाहीं, का कीं, दक्षिण ध्रुवाकडे जहाजांत बसून गेलें असतां संकटें व क्लेश अवश्य व्हावयाचेंच, ते येणें करून दूर झाले. असो, आतां अनिवार आवश्यकते मुळें उत्तरेकडेस मागें जाणें त्यास अर्थात प्राप्त झालें.

क्रांतिवृत्तास पोंचायाचे पूर्वी जर कांहीं उद्योग उपस्थित झाला नाहीं, तर येता हिंवाळा त्याच रत्नांत घालवावा असा आतां **कपूतानकूक** त्याचा बेत होता. त्याचें जहाज चांगलें, व खलाशी निरोगी होते, आणि खायाचे पदार्थ किंवा दुसरा सरंजाम ह्यांचा त्याजपाशीं तोटा नव्हता असें असून दक्षिण पासिफिक सागर सोडून जाणें, ह्मणजे केवळ दीर्घ प्रयत्नाचा अभाव दाखविणें च नव्हे, तर ह्या समयीं त्या सागरांचा इतका चांगला शोध करितां येईल कीं, त्याहून आणखी कांहीं अधिक शोध करणें अशक्य, अशा विचाराचाही अभाव आहे, हें दर्शनास आणणें होय. ह्मणून त्यानें पुढील मोठे कार्याची योजना केली, तिजवर त्याच्या कामदारांच्या पूर्ण संमती पडल्या.

पुढें लौकरच **कपूतानकूक** ह्यास पित्तशूळाचा उपद्रव झाला त्याच्या भरामुळें कांहींकाळपर्यंत तो बिछान्यांत निजून राहिला. जेव्हां तो बरा व्हायास लागला तेव्हां जहाजावर ताजें मांस कोणतेंच नव्हतें, व त्याच्यानें तर त्याज खेरीज कांहींच खाववेना. असें संकट प्राप्त झालें असतां, एक्या गृहस्थाचा एक आवडता कुत्रा होता तो मारून त्यास खायास घातला. ह्या प्रकारें युरोपांतील बहुतेक लोकांस जें खाणें पराकाष्ठेचें त्रासदायक झालें असतें तशा खाण्या पासून त्यानें उपजीवन, व सामर्थ्य, प्राप्त करून घेतलें. अडचणीचे गोष्टी पुढें

नावडीचें कांहीं चाललें नाहीं.

मार्चाच्या अकराव्या तारिखेस सफर करणारे **इस्तर** नामक बेटापासू-न दृष्टीचे टप्प्यांत आले. तें बेट दक्षिण अक्षांश पंचाहत्तर अंश पांच कळा, आणि पश्चिमरेखांश एकशें नव अंश व शेहताळीस कळा, ह्यासुमारास आहे. सांगाया सारिखें काम ह्या बेटांत त्याच्या हातून झालें नाहीं, पण तेथील लोकांस चोरी करण्याची अतिशय चटक आहे व त्या बेटांतही लक्ष्य लावण्याजोगें वस्तू कांहीं नाहीं, असें त्यांनीं पाहिलें.

तेथून ते **मारक्किसास्** नामें बेटें आहेत तेथें गेले. आणि त्या पैकीं एक **सेंटक्रिष्टिना** ह्मणून आहे त्याच्या एक्या खाडींत जहाजें नांगरिलीं. तेथील लोकां बराबर व्यापार सुरू झाला, त्याकाळीं, व्यापारांत त्यांच्या भामटे पणाच्या कसबास प्रतिबंधक करायास फार अवघड पडलें. पण जलप्रवास करणाऱ्यांस गोराडू, केळीं, व ब्रडफ्रूट ह्मणून फळें आहेत ह्यांचा चांगला पुरावा; तसेंच थोडेसे नारळ, पांखरें व कांहीं डुकरांचीं पोरें, व आणखी दुसरे पदार्थ मिळाले. **मारक्किसस्** ह्या बेटांचे स्थळाचा निर्णय करावा, हेंच **कप्तान कूक** ह्याचें तेथें जाण्याचें मुख्य कारण होतें; ह्याच्या पूर्वी त्याची बराबर माहिती झाली नव्हती. ह्या बेटांतील राहाणाऱ्यांविषयीं ही गोष्ट ध्यानांत धरण्याजोगी आहे कीं, एकंदरीनें पहातां, ह्या समुद्रांतील लोकांमध्यें ते सर्वोत्कृष्टरूपवान् होते, किं बहुना, प्रमाणाचा आकार, व बेताचे तोंडवळे, ह्याविषयीं तर ते इतर सर्वदेशांतील लोकांपेक्षां वरचढ होते. परंतु **ओटेहीट** व **सोसेटी** बेटें येथील भाषांशीं त्यांच्या भाषेचा संबंध होता, त्यावरून त्यांचें व ह्यांचें मूळ एकच हें उघड होतें.

मारक्किसस् बेटांहून निघाल्यावर कपुतानकूक ह्यानें अणखी एकवेळ ओटेहीट बेटाचा रस्ता धरिला. आणि त्याचें नांगर टाकायाचें पहिलें ठिकाण, ह्मणजे माटेवाई नामें खाडी, येथें एप्रिल महिन्याच्या बाविसाव्या तारिखेस तो जाऊन पोंचला. खायाचे पदार्थ पुष्कळ मिळाले, ह्मणून त्यानें येथें कांहीं दिवस मुकाम करायाचा बेत केला. ह्याचें कारण, ज्योतिष संबंधी वेध करून गलबतावरील कालमानांत चुका पडल्या होत्या त्या नीट करणें इतकेंच नव्हतें, तर दक्षिणेकडील बर्फमय समुद्रांत मागें नुकतेंच गलबत चालविल्यामुळें त्यास जी दागदोजी अवश्य करावयाची होती तीहीकरून घ्यावी, हेंही येथें रहायाचें कारण होतें.

ह्यावेळीं सफरीलोकांचा येथें मुकाम होता, तोंवर नानाप्रकारच्या दर्शनांकडून त्यांस करमणूक झाली; त्या दर्शनांत आरमाराची कवाईत हें एक होतें. मोठाल्या व दुहेरी अशा एकशें साठ लढाऊ नावा होत्या, त्यांत चांगला सरंजाम, मनुष्यें, व हत्यारें हीं होतीं; निशाणें, झेंडे ह्यांकडून त्या शृंगारिल्या होत्या. सरदार व जे कोणी युद्धस्थानीं होते, त्यांनीं आपला लढाऊ पेहेराव केला होता. तें सर्व अरमार उमदें दिसत होतें असें कीं, सफर करणाऱ्यांनीं तसें पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें. लढाऊ जहाजांशिवाय लहान लहान दुहेरी होड्या होत्या त्या ने आण करायास व खाण्याचा वगैरे सरंजाम पुरवायास योजिल्या होत्या असें दिसलें. त्यांतून एकेक होडीवर एकेक लहान घर होतें. तसेंच एकेक डोलकाठी व एकेक शीड होतें, तसें लढाऊ नावांवर नव्हतें. त्या सर्व अरमारांत सात हजार सातशें साठ ह्यांहून कमी माणसें नव्हतीं असें कपुतान कूक ह्यानें अनुमान केलें. ह्या अरमाराचा उद्देश काय होता, ह्याविषयींचें पुरतें वर्तमान लागलें

नाहीं.

ओटेहीट बेटांतील एका मनुष्यानें पाण्याचें पिंप चोरण्याचा उद्योग केला, त्यामुळें तेथीललोक व इंग्लिश ह्यामध्यें जी एकचित्तता होती तींत कांहींवेळ अंतर पडलें. त्या मनुष्यास चोरी करतांना पकडलें. आणि त्यास शिक्षा करण्याविषयीं त्या बेटाचा राजा राजी नव्हता, ह्मणून कांठावर नेऊन त्यास चोवीस जेरबंद मारावे, असा कप्तान कूक ह्यानें आपल्या लोकांसच हुकूम केला. परंतु पुढें, शिक्षा केली तें योग्य केलें असें त्या राजानें कबूल केलें, आणि पुनः स्वस्थता झाली. ह्यागोष्टी विषयीं पहातां एका परमुलखांतील मनुष्यानें दुसऱ्या देशांतील मनुष्या वर त्या देशाचे राजाच्या समक्ष, व त्याराजाची आज्ञा नसतां किंबहुना त्याच्या इच्छेविरुद्ध, वर सांगितल्या प्रमाणें न्यायाचा अम्मल चालविणें ही मनुष्याच्या इतिहासांत निश्चयें करून एक विलक्षण गोष्ट होय.

ह्या खेपेस ओटेहीट बेटांत जे खायाचे पदार्थ मिळाले त्यांपासून जहाजावरील मंडळीस मोठा उपयोग झाला, कारण, त्यांनीं ज्या भाकरी राखून ठेविल्या होत्या त्या बहुतकरून सर्व नासून जाऊन खाण्याजोग्या राहिल्या नव्हत्या अशा खराब असून ही पुष्कळ होत्या असें नाहीं, तर अगदीं थोड्या थोड्या वांट्यास येऊं लागल्या होत्या.

ओटेहीटबेट सोडिल्यावर सफर करणारे पुनः हाहीनबेटास आले. येथें कप्तान कूक ह्याचा पूर्वीचा मित्र ओरी ह्यानें लागलीच त्याची भेट घेतली, आणि मागें जसा सलुखानें व्यवहार चालला होता, त्याच प्रमाणें आतां ही त्या उभयतां मध्यें चालू झाला. कप्तान कूक ह्याचा

हाहीनबेटांत मुक्काम होता तों पर्यंत, ब्रेडफ्रूट (ह्मणून फळें आहेत) नारळ व दुसऱ्या शाकभाज्या वगैरे पुष्कळ मिळाल्या, परंतु जहाजावरील मंडळीस नित्याचे खर्चापुरतीं डुकरें मिळालीं नाहींत, व्यापारा करितां जे असावे ते जिन्नस त्यांपाशीं नव्हते ह्मणून कांहींसें असें झालें. ह्मणून ह्या पुढें ज्या बेटांत जावयाचें होतें तेथें खायाचे पदार्थ मिळावे, व तेथील लोकां मध्यें आपला विश्वास व मान्यता राहावी ह्यास्तव लोहारा कडून परोपरीचे खिळे, लोखंडी हत्यारें, व शस्त्रें, हीं करायाचें कपूतानकूक ह्यास प्राप्त झालें.

हाहीन बेटाहून गलबत चालतें होण्यास सिद्ध झालें, तेव्हां सर्वांच्या मागून ओरी हा त्यांतून बाहेर आला. निघतेवेळीं कपूतानकूक त्यास बोलिला कीं, ह्या उपर परस्परें भेटी व्हायाच्या नाहींत, तेव्हां तो रडून बोलिला कीं, "तर मग तुमच्या मुलांस येऊं द्या, आह्मी त्यांशीं नीट वागूं"

कपूतानकूक ह्यानें येथून युलिटीआ ह्याचा रस्ता धरिला. तेथें ज्या गोष्टी घडल्या त्या बहुतकरून मागें सांगीतलेल्या गोष्टीं प्रमाणेंच आहेत. ह्या बेटांतील लोकांनीं ह्यांची भेट वारंवार आदर सत्कार पूर्वक घेतली. आणि कपूतानकूक ह्याच्यानें होईल तितकी मेहरबानी करायास ते योग्य होते. तो जाऊं लागला, तेव्हां ते अत्यंत खेद करूं लागले, आणि "परतया" असें त्यांनीं उत्कंठेनें पुनः पुनः त्यास ह्मटलें. ओरी नाईक व विशेषेंकरून त्याची बायको व मुलगी ह्या दोघी तर रडतां राहिल्या नाहींत; आणि शेवटीं जेव्हां जहाज चालतें झालें तेव्हां तर ते शोकसागरांत बुडून गेले.

कपूतानकूक पहिल्यानें जेव्हां ह्या बेटास आला, तेव्हां बोलाबोला

बेटास जावें असा त्याचा कांहींसा बेत होता, परंतु खायाच्या पदार्थांची बहुत वरव पूर्वीच मिळाली ह्मणूनव ज्या रस्त्यानें जायाचें त्याच्या मनांत होतें, त्या रस्त्याच्या धोरणाकडे लागल्यामुळें त्यास फुरसत मिळेना, ह्मणून ती मसलत ठेवून त्यानें पश्चिमेकडचा रस्ता धरिला. दुसरीं कितीएक बेटें टाकिल्यावर ज्यूनमहिन्याच्या विसाव्या तारिखेस तो एक्या बेटास येऊन पोंच-ला; तेथें वस्ती बहुत होती असें दिसलें. कपूतानकूक व दुसरे गृहस्थ त्याच्या कांठावर गेले, परंतु तेथीललोक क्रूर व कह्यांत न राहाणारे असे होते, त्यां बराबर बोलणें चालणें व्हावें ह्मणून त्यांस वळवायाचा यत्न केला, पण तो सर्व फुकट गेला. वनपशू प्रमाणें ते भयंकर रीतीनें जवळ आले, आणि लागलेच बऱ्या मारूं लागले. तेव्हां दोनतीन बंदुका आकाशांत सोडिल्या, तरीं एक असामी आणखी पुढें आला आणि त्यानें दुसरा भाला मारिला, तो कपूतानकूक ह्याच्या खांद्यावरून जवळून गेला. ह्या धैर्यामुळेंच तो मनुष्य बहुधा प्राणास मुकला असता, तो असा, त्यानें जेव्हां भाला झोंकिला तेव्हां तो कपूतानकूक ह्या पासून पांच पावलें ही दूर नव्हता, व कपूतान कूक ह्यानें तर आपल्या रक्षणाकरितां त्यास गोळी घालून मारायाचें योजिलें होतें, परंतु त्याची बंदूक रंजक ग्याली. अशी त्याची गोष्ट घडली ह्मणून कपूतानकूक ह्यास पुढें संतोष झाला.

तेथील लोकां बराबर व्यवहार चालू होईना, व त्यांपासून कांहीं उपयोग ही होईना असा त्या लोकांचा स्वभाव व वर्तणूक होती, त्यावरून कूकसाहेबानें त्यास सावेजऐलंड ह्मणजे अडाणी बेट असें नांव दिलें, त्याचा घेर सरासरी चवेताळीस मैल, व आकार वाटोळा, आणि उंची बरीच

आहे; व त्याच्या कांठापासून ओंड पाणी जवळ आहे. त्याच्या ज्या दुसऱ्या गैरसोयी आहेत, त्यांत त्याला चांगलें बंदर नाहीं, ही एक गैरसोय आहे.

पश्चिम नैऋत्येकडेस जातां जातां कपूतानकूक ह्यास ल्हान ल्हान बेटांचा एक समुदाय आढळला, आणि सव्वीसाव्या तारिखेस अनामुका अथवा राटर्डम् ह्याच्या उत्तरेच्या बाजूस त्यानें गलबत नांगरिलें. तेव्हां तेथल्या राहणाऱ्यां बराबर लागलाच व्यापार चालू झाला. त्यां पाशीं खायाचे पदार्थ, मुख्यतें गोराडू व ग्वकोतरे, होते, ते देऊन त्यांबद्दल खिळे, पोल, व दुसरे लहान साहान पदार्थ त्यांनीं घेतले. मागें बहुतवेळ दगदग पडली त्याप्रमाणें येथेंही कप्तान कूक ह्यास त्यालोकांच्या चोरट्या स्वभावा मुळें थोडीशी पडली. हें बेट लहान व तिकोनी आहे. हालंड देशाचा नौकागमनवेत्ता नामें टासूमन त्यानें पहिल्यानें त्याचा शोध लावून राटर्डम् असें त्यास नवें नांव दिलें होतें. हें बहुतबेटांचा एक समुदाय आहे, तेथील लोकांत दृढस्नेह व प्रीति हीं वसत होतीं असें दिसलें, व ते परक्या बराबर ममतेनें व आगत स्वागत पूर्वक वर्ततात्, ह्मणून त्यासमुदायास कपूतानकूक ह्यानें फ्रेंड्ली ऐल्इस् ह्मणजे स्नेही बेटें असें नांव दिलें, त्या समुदायांतील व राटर्डम हें एक बेट आहे.

पश्चिमेकडेस जातां जातां, ज्यूलै महिन्याच्या सोळाव्या तारिखेस सफर करणारे ह्यांच्या दृष्टीस जमीन पडली तेव्हां फ्रान्सदेशाचा नौकागमनवेत्ता नामें एमूडीबोगाविली ह्यानें ज्या भूमीस ग्रेटसैक्लेडिस असें नांव दिलें, तीच ही असें त्यांस वाटलें. कांहीं दिवस पर्यंत ह्याबेटाच्या कांठाचा तपास केल्याबर मालिकीलो नामक एक्या बंदरांत त्यांनीं आपलें

गलबत नांगरिलें. तेथें ज्या गोष्टी मुख्यतें कर्तव्य होत्या, त्यांत तेथीललोकां बराबर स्नेहाचा व्यवहार चालू करावा, हीही गोष्ट कपूतानकूक ह्याच्या मनांत करायाची होती. परंतु तो ती गोष्ट करायास लागला असतां एक प्रसंग घडून आला, त्याच्या योगें सर्व गोष्टींची अव्यवस्था होऊन गेली; तो प्रकार असा; होडींतीलएका मनुष्यास नावेवर येऊं दिलें नाहीं, ह्मणून तो नावेवरील लोकांवर विखारलेला तीर माराया करितां कमानवांकवूं लागला. असा त्याचा बेत पाहून लहानशी गोळी घालून कपूतानकूक ह्यासत्यावर बंदुक सोडणें प्राप्त झालें. नंतर तो कपूतानकूक ह्यास तीर मारायाचा यत्न करूं लागला, परंतु दुसरी बंदुक सोडिली त्यामुळें त्यानें आपलें हत्यार टाकून दिलें. त्या समयीं तेथील आणखी कांहीं लोकांनीं इंग्लिशांवर तीर चालू केले. परंतु चार रतली गोळा त्यांच्या डोक्यावरून पार मारितांच ते अतिशय घाबरून पळून गेले.

त्या स्थानंतर थोडे तासांनीं, इंग्लिश लोक दोन नावांत बसून, कांठावर चारपांचशें लोक जमा झाले होते त्यांच्या पुढें जाऊन जमीनीवर उतरले, आणि त्या सर्व इंडियन लोकांपाशीं तीरकमानी, सोटे, आणि भाले, होते तरीं त्यांनीं काडीमात्र अडथळा केला नाहीं; पण उलटें जेव्हां कपूतान कूक हा हातांत हिरवी डाहाळी मात्र घेऊन पुढें येत आहे असें त्यांनीं पाहिलें, तेव्हां त्यांत एकजण मुख्यसा दिसत होता, तो आपली तीरकमान दुसऱ्या जवळ देऊन आपणही हिरवी डाहाळी हातांत घेऊन कपूतान कूक ह्यास पाण्यांत येऊन भेटला. मित्रपणाचीं चिन्हें ह्मणून त्या डाहाळ्यांची परस्परांनीं अदलाबदल केल्यानंतर कपूतानकूक ह्यास त्या

समुदायाकडेस नेलें. तेव्हां त्यानें लागलेंच त्यांस नजराणे वांटले. इकडे जहाजा वरील शिबंदीलोक समुद्राच्या कांठावर आणून उभे केले. मग कपूतान कूक ह्यानें खुणाकरून इंडियन लोकांस समजाविलें कीं, आह्मांस लांकडें पाहिजेत, तेव्हां झाडें तोडण्याविषयीं त्याला ही त्याच रीतीनें परमाणगी मिळाली.

ह्यालोकांबरोबर फारसा व्यापार चालला नाहीं, कारण, खिळे, लोखंडी हत्यारें, अथवा जे जिन्नस सफर करणारांपाशीं होते त्यांतून एकही त्यांस उपयोगी असा वाटला नाहीं. त्यांनीं थोडी बहुत देवघेव केली, ती विशेषें करून कापडाच्या ताग्याकरितां तीरांची केली, त्यांत त्यांनीं भलेपणा दाखविला. जेव्हां त्या बेटाहून जहाज चालूं लागलें तेव्हां त्यांच्या होड्या जहाजाच्या मागें राहिल्यामुळें ज्या जिनसांची किंमत त्यांस मिळाली होती त्या जिनसा देणें हें सहज टळलें असतें, परंतु आपणावरील उपकार फेडून टाकण्याकरितां त्यांनीं जहाजाजवळ पोंचायास पराकाष्ठेची मेहनत केली. त्यांत विशेषेंकरून एक मनुष्य पुष्कळवेळ पर्यंत रेसोल्यूशान जहाजाच्या मागें गेला, आणि ज्या गोष्टीकरितां तो गेला त्या गोष्टीची जहाजावरील मनुष्यांस विस्मृति पडेपर्यंत तो त्या जहाजाशीं जाऊन ठेपला नाहीं. जहाजाच्या बाजूशीं जातांच, त्यानें जो जिन्नस विकत दिला होता तो वर उचलून धरिला, तेव्हां कितीएक खलाशी तो विकत घेऊं लागले, तरीं ज्यास तो पूर्वीं विकत होता त्याच्याच हवालीं करीन असा त्यानें हट्ट धरिला. त्यामनुष्यानें तर त्यास पुनः बोळखिलें नाहीं ह्मणून त्या पदार्थाबद्दल तो त्यास कांहीं देऊं लागला, परंतु त्यानें तें कबूल नकरून जें पूर्वीं त्यास दिलें होतें तें त्याला दाखविलें.

सफर करणारांनीं जे लोक पाहिले होते त्यांत ह्या बेटांतील राहाणारे बहुत करून अत्यंत कुरूप व मळकटशा शारीराचे होते. त्यांचा रंग काळा

उंची कमतीच, डोकीं लांब लांब, तोंडें रुंद व चेहेरे माकडांच्या सारिखे होते.

येथून नैर्ऋत्य दिशेकडे जात असतां रेसोल्यूशन जहाजास कितीएक लहान लहान बेटें लागलीं, त्यांस कपूतानकूक ह्यानें नावें दिलीं, आंतून बहुतेकांत वस्ती होतीशी दिसली टाना नामाच्या बेटांत एक ज्वालामुखी होती, तिजमधून वेळोवेळीं भयंकर अवाज होत असे, व दरतीन अथवा चार मिनिटांनीं मोठा बार होत असे, त्याबरोबर विस्तव व धूर ह्याचे लोट बाहेर येत होते. एक्या वेळीं तर मोठमोठे दगड आकाशांत उंच गेलेले पाहिले.

टाना बेटाच्या पलीकडे ज्या बंदरांत जहाज नांगरिलें होतें, तें बंदर केवळ सरासरी पाऊण मैल लांबीचें असें एक वांकण होतें, परंतु लांकडें व पाणी मिळण्यास ह्यापेक्षां सोयकर दुसरी जागा सांपडली नाहीं.

टानाबेटांतील लोकां बराबर व्यापार थोडा चालला. लोखंडाचें ज्ञान त्यांस अगदींच नव्हतें, ह्मणून पूर्वेकडील बेटांत जसे खिळे, हत्यारें व दुसरे लोखंडी पदार्थ हे तेथील लोक फार उत्कंठेनें घेत होते, तशी येथें त्यांची कांहीं चाहा नव्हती. त्यांच्या सारिख्या उघडे फिरणाऱ्या लोकांस वस्त्रांचा ही उपयोग नव्हता. आगष्ट महिन्याच्या विसाव्या तारिखेस कपूतानकूक टानायेथून निघाला, आणि त्याच्या भोंवतालच्या बेटांचा आणखी तपास करण्यांत त्यानें बाकी राहिलेला सर्व महिना घालविला. तो सर्व आर्चिपिलगो ह्मणजे बेटांचा समुदाय, ह्याचें तपास करणें संपवून, व पूर्वीं होती त्यापेक्षां त्यांची विशेष माहीतगारी करून घेऊन त्यानें त्यांस न्यूहिब्रिडिस असें नांव दिलें.

मोसमचे दिवस आले ह्मणून पुनः दक्षिणेकडे जाणें त्यास अवश्य झालें. तथापि, न्यूहीब्रिडिस् व न्यूझीलंड ह्यांच्या मध्यें एखादी जमीन आढळली तर तिचा शोध लावायास, अद्यापि त्याला अवकाश होता. आणि आपल्या लोकांस विसांवा द्यावा, व दुसऱ्या दक्षिणमार्गाकरितां लांकूड पाणी ह्यांचा नवा सांठा करून घ्यावा, ह्मणून त्या ठिकाणीं पुनः बंदर करावें असेंही त्यानें योजिलें. ह्या बेतानें सप्तेंबरच्या पहिल्या तारिखेस त्यानें जहाज हाकारिलें. चौथ्या दिवशीं जमीन दृष्टीस पडली, तिच्या एक्या बंदरांत दुसऱ्या दिवशीं रेसो ल्यूशन जहाज नांगरिलें. देशाचा शोध करावा एवढ्याच करितां कप्तान कूक ह्यानें तेथें उतरायाचा विचार केला असें नाहीं, तर सूर्य ग्रहण जवळ आलें होतें तेंही त्यास पाहायाचें होतें. तेथील राहाणाऱ्यां बरोबर लागलाच व्यापार सुरू केला. त्याचा तेथें मुकाम होता तोंपर्यंत त्या लोकांनीं भिडस्तपणें व मित्रपणें वर्तणूक केली, तिज बद्दल त्याच्या हातीं होतें तितकें कप्तान कूक ह्याने त्यांचें हित केलें. तेथीललोक त्या बेटास काय ह्मणत असत, हें त्यास समजलें नाहीं ह्मणून "न्यूक्यालेडोनिया" असें त्यानें त्याचें नांव ठेविलें. न्यूझीलंड बेट खेरीज करून दक्षिण पासिफिक समुद्रामध्यें हें बेट कदाचित् अति मोठें असेल. तेथीललोक बळकट, निरोगी, चपळ, व देखणे, असे होते; व स्वभावानें सभ्य व परोपकारी होते. त्यांच्यांत चोरी करण्याची खोड अगदीं दिसून आली नाहीं.

चालू होण्याची सर्व तयारी झाली तेव्हां न्यूक्यालिडोनिया ह्याचा कांठ शोधावा अशा विचारानें सप्तेंबरच्या तेराव्या तारिखेस कप्तान कूक ह्यानें गलबत हाकारिलें. ह्या कामामुळें, नौकाशास्त्र, व भूगोलविद्या, ह्यांचें ज्ञान

पुष्कळ वादवाथास तो समर्थ झाला; परंतु ते काम करीत असतांरेसाल्यूशन जहाजास बुडून जायाचें संकट अनेकदां प्राप्त झालें. त्यानें तें बेट सोडिल्यावर जमीन दृष्टीस पडली तिच्याजवळ गेल्यावर, तें बरेंच उंचीचें व वीसमैलघेऱ्याचें बेट आहे, असें समजलें. होवर्डाच्या थोर कुळाच्या सन्मानार्थ कप्तानकूक ह्यानें त्यास "नार्फोक बेट" असें नांव दिलें. तेथें वसूती नव्हती, व न्यूझीलंड बेटांत जीं साधारण नव्हत, अशीं रोपें आणि झाडें तेथें बहुत पाहाण्यांत आलीं; त्या देशाच्या इतर भागांपेक्षा येथें जवसांचीं रोपें फार फोंपावलीं होतीं त्या बेटांत मुख्य उपज सुरेख सरळ नामक झाडें आहेत, तीं दाट, उंच, आणि सरळ अशीं असतात व तीं फार उत्पन्न होतात.

नार्फोकबेटाहून कपूतानकूक न्यूझीलंडबेटांत क्वीनचार्लटसूसोंड नामक अखात आहे, तेथें जायास निघाला. आणि तो लौकरच तेथें जाऊन दाखल झाला. पूर्वीं एक्या खेपेस तेथें जे बाग केले होते त्यांची चौकशी करितां तेथील लोकांनीं त्याजकडेस अगदीं लक्ष्य न दिल्यामुळें ते आपल्या स्वाभाविक स्थितींत आहेत असें दिसून आलें. तथापि त्या जमीनीच्या उत्कृष्टपणामुळें कितीएक पदार्थ चांगल्या स्थितींत होते.

कितीएक दिवस पर्यंत तेथील लोकांपैकीं कोणीही दृष्टीस पडलें नाहीं; परंतु जेव्हां ते तेथें आले, आणि त्यांनीं कपूतानकूक व त्याचे मित्र ह्यांस वळखिलें, तेव्हां भीति दूर होऊन त्यांस आनंद झाला. त्यांच्या रोव्या रानांतून येऊन, ते वेड्या सारिखे इकडे तिकडे उड्या मारून, पुनः पुनः इंग्लिशांस आलिंगन देऊं लागले. न्यूझीलंड बेटांतील लोकांची ही तिसरी भेट; ह्या वेळेस जो त्यांज बराबर व्यवहार झाला, तो सर्व स्वस्थपणें व मित्रपणें झाला.

दक्षिणेकडेस महाद्वीप आहे किंवा नाहीं ह्याचा निर्णय करणें हें कप्तान कूक ह्याचें मुख्य कार्य होतें, त्या कार्याविषयीं आणखी पुढें शोध करावा ह्मणून नोवेंबरच्या दाहाव्या तारिखेस तो न्यूझीलंड येथून निघाला. दक्षिणे कडेस त्रेतालिसांपासून. तर पंचावन्न इतक्या अक्षांशां पर्यंत, वेगवेगळ्याल्या अक्षांशांत सत्ताविसाव्या तारिखे पर्यंत फिरून, शेवटीं, ह्या महासागरांत आणखी जमीन शोधून काढण्याची सर्व आशा त्यानें सोडिली. ह्याजकरितां, केपूहार्न ह्याच्या भोंवतीं लीमेरच्या सामुद्रधुनी पर्यंत टेराडेल्फ्यूगो ह्याच्या दक्षिण बाजूच्या कांठाकांठानें गलबतांतून फिरावें ह्यास्तव थेट मागालिननामक सामुद्रधुनीच्या पश्चिमेकडील तोंडा पर्यंत जाण्याचा त्यानें निश्चय केला.

अशी सफर करितां करितां कप्तानकूक हा डिसेंबरच्या सत्ताव्या तारिखेस टेराडेल्फ्यूगो ह्याच्या पश्चिम कांठ्यास येऊन पोंचला; आणि विसाव्या तारिखेपर्यंत त्या सभोंवतीं फिरून एका ठिकाणीं त्यानें जहाज नांगरिलें. त्या ठिकाणास पुढें त्यानें क्रिष्ट्मससोंड असें नांव दिलें. कप्तान कूक ह्यानें बहुत सफरी केल्या, परंतु ह्या कांठ्या सारिखा उजाड कांठा त्यानें कोठें पाहिला नव्हता. तो केवळ खडकाळ व डोंगरमय असा होता, व तेथें झाडें झुडें अगदीं नव्हतीं. ह्या डोंगरांच्या शेवटांकडेस भयंकर कडे आहेत, त्यांचीं पाषाणमय शिखरें आकाशांत पुष्कळ उंच गेलीं आहेत, तेणें करून त्या सर्व देशाची रचना पृथ्वींतील सर्व पदार्थांहून भयंकर दिसते.

ती जमीन पडीत आणि उदास होती, परंतु ती अगदीं सोयकर नव्हती असें नाहीं, कारण तेथील प्रत्येक बंदराजवळ गोडें पाणी व सरपणा करितां लांकडें हीं सफरीलोकांस मिळालीं, तसेंच त्या देशांत वनपक्षी बहुत

व विशेषेंकरून हंस फार होते. त्यांच्या योगें जहाजावरील खलाशी लोकांस खाणें मिळालें, आणि पुढें क्रिस्तमस्डे ह्मणून सण आला होता त्यामुळें तर तें फारच प्रिय झालें. दैवयोगानें हें त्यांस मिळालें, नाहींतर खारलेलें गोमांस आणि डुकराचें मांस, हाच क्रिस्तमस्डे सणांत भोज्योपचार झाला असता. खाण्याच्या पदार्थांपैकीं कांहीं मदिरा दारू मात्र अझून शिलकेस होती ती राखून ठेविल्यामुळें चांगली झाली होती; ती दारू, व हंस शिजवून त्याचे परोपरीचे पदार्थ केले होते, त्या दोहोंच्या योगानें, सफर करणारे ह्यांनीं, त्यांच्या इंग्लंडांतील मित्रांनींजसा क्रिस्तमस्डेच्या सणाचा समारंभ आनंदानें केला असेल तसाच बहुधा केला.

कपूतान कूक पुढें लोकरच लिमेरचे सामुद्रधुनी मधून स्टेटन बेटास गेला. त्या बेटा भोंवतीं फिरत असतां एक बंदर सांपडलें; त्याबंदराचा शोध लागल्यामुळें पुढील नौका गमन करण्यास फार उपयोग होईल असें वाटलें. सन १७७५ यांतील ज्यानेवारी महिन्याच्या चवथ्या तारिखेस त्यानें पूर्व कडेस जहाज हाकारिलें. तेव्हां सुमारें दहा दिवसांनंतर जमीन दृष्टीस पडली, ही एका महाद्वीपाचा भाग आहे, असें पहिल्यानें वाटलें, परंतु कपूतान कूक हा तिच्या कांठाकांठानेंच फिरला, तेव्हां सुमारें दोनशेंदाहामैल घेर्यानें हें एक बेटच आहे असें समजलें. आपल्या माजी राजाच्या सम्मानार्थ ह्यानें त्यास ज्यार्जबेट असें नांव दिलें. ही ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे कीं, त्या बेटाच्या अवघ्या किनाऱ्यावर एखादी नदी किंवा गोड्या पाण्याचा ओहोळ हें पाहाण्यांत आलें नाहीं.

आग्नेयी दिशेकडेस जात असतां, एक तिसाव्या तारिखेस दुसरा एक बेटांचा जथा दृष्टीस पडला, त्यांतून एका बेटास त्यानें दक्षिणथ्यूल असा

किताब दिला, कारण कीं त्यावेळेस जीं बेटें सांपडलीं होतीं, त्यांत हें अति दक्षिणेस होतें. तें सर्वत्र बर्फानें झांकून गेलें होतें व त्याचा पृष्ठभाग फार उंच दिसत होता.

कपूतान कूक ह्यानें केप आफ् गुड होप येथून निघतांना जो रस्ता पाहिला होतो तो फेब्रुवारीच्या अखेरीचे सुमारास त्यानें वोलांडिला. ह्या प्रकारें, दक्षिण महासागराची प्रदक्षिणा ह्यावेळीं त्यानें परम दक्षिण अक्षांशांत केली; आणि महाद्वीप असलें तर कदाचित् ध्रुवाच्याजवळ व तें, जेथें नौका गमनाचा लाग नाहीं अशा ठिकाणीं असेल, ह्या खेरीज गोलार्धाच्या त्या भागांत एखादें महाद्वीप असण्याचा संभव वाटायास जागा न राही अशा रीतीनें त्यानें तो महासागर धुंडिला. अयनवृत्तांतील समुद्रांत दोनवेळ खेपा केल्यावरून, पूर्वीं शोधून काढिलेल्या कांहीं बेटांच्या स्थळांचा कपूतान कूक ह्यानें निर्णय केला इतकेंच नाहीं, तर त्यानें नवे शोध बहुत लाविले, व त्या भागांत देखिल आणखी पुढें करायाचें असें थोडेंच ठेविलें. जल प्रवासाचा उद्देश सर्व प्रकारें सिद्धीस गेला, व दक्षिण गोलार्धाचा शोध पुरतेपणें लागला; येणेंकरून दक्षिण महाद्वीपाचा शोध करण्याचें काम अगदीं बंद झालें.

कपूतान कूक ह्याचें भूगोला भोंवतीं नौकागमन करण्याचें महत्कार्य ह्या प्रमाणें शेवटास गेल्यावर शेवटीं त्यानें इंग्लंड देशास जाण्याचा विचार केला. त्याचें जहाज आणखी बहुत संकटें सोसाया जोगें राहिलें नव्हतें, व त्याचीं शिडें व दोर वगैरे सरंजाम इतका जीर्ण झाला होता कीं, त्यांतून कांहीं ना कांहीं घडोघडी पडून जाऊं लागलें. व तें नीट करायास ही त्या जहाजांत.

कांहीं राहिलें नव्हतें. खायाचे पदार्थ इतके खराब झाले होते कीं, त्यां कडून पोषण होईनासें झालें; आणि जहाजावरील मंडळीसही फार दिवस विश्रांति मिळाली नाहीं. सरदाराच्या हातीं होतें तितकें त्यानें त्यांचें लालन करावें, अशा रीतीनें ह्या मनुष्यांनीं, जलप्रवासाच्या प्रारंभापासून शेवट पर्यंत वर्तणूक केली. व कामदारांच्या वागणुकेवरून त्यांस हिम्मत येऊन, त्यांस जीं संकटें व अडचणी प्राप्त झाल्या होत्या त्या अनिवार नव्हत्या असें त्यांनीं दाखविलें.

ह्या सर्व गोष्टींचा विचार करून कपूतानकूक ह्यानें केपआफ् गुड होप येथें जाण्याचा निश्चय केला; आणि त्याच्या (ज्यानें पृथ्वी प्रदक्षिणा केली होती) हिशेबा प्रमाणें मार्चाच्या बाविसाव्या तारिखेस बुधवारीं, परंतु, केप येथील मानानें, एकविसाव्या तारिखेस मंगळवारीं, टेबल अखातांत येऊन त्यानें आपलें जहाज नांगरिलें. केपआफ् गुड होप येथून निघाल्या दिवसा पासून पुनः तेथें परत येई पर्यंत, जी भूगोला भोंवतीं प्रदक्षिणा झाली तितक्यांत साठहजार मैलांपेक्षां कमीफिरणें झालें नाहीं. इतकी जलप्रवासाची लांबी ह्मटली ह्मणजे बहुत करून पृथ्वीच्या समरेषा परिघाच्या तिपटी बराबर झाली. एवढा प्रयास इतक्या वेळांत पूर्वीं कोणी एकानेंही नावेंत बसून कधीं केला नव्हता.

ह्या जलप्रवासाचें जें शेष राहिलें आहे त्याविषयीं विस्तारें सांगण्याची गरज नाहीं. जरीं ह्यावेळीं कपूतानकूक ह्यानें नौकाशास्त्र व भूगोलविद्या ह्यांकडे पूर्वीं प्रमाणेंच लक्ष्य दिलें, आणि पाहाण्या जोगें जें

जें आढळलें त्याचें वर्णन पहिल्या प्रमाणें बुद्धिकौशल्यानें केलें, तथापि त्यास सांप्रत कांहीं अज्ञात समुद्रांत फिरायाचें नव्हतें, किंवा जे देश पूर्वी ऐकिलेही नव्हते त्यांचा शोध लावायाचा मक्ता, ह्याजकरितां इंग्लंडास पोंचायाच्या पूर्वी ज्या ज्या ठिकाणीं त्यानें बंदरें केलीं, तीं तीं ठिकाणें थोडक्यांत सांगितलीं ह्मणजे पुरे होईल. गलबताची मरामत झाल्यावर, व अगत्याचा सरंजाम व खायाचे पदार्थ, व पाणी, ह्यांचा ताजा पुरावा अहाजावर घेतल्यावर, कप्तान कूक हा एप्रिलच्या सत्ताविसाव्या तारिखेस केपआफगुडहोप येथून निघाला, तो मेच्या पंधराव्या तारिखेस सेंटहेलीना बेटास येऊन पोंचला; येथें एकविसाव्या तारिखे पर्यंत राहून तेथून असेन्शन् बेटास जाऊन तेथें त्यानें अठ्ठाविसाव्या तारिखेस जहाज नांगरिलें. येथून, फर्नांडो नरोन्हा ह्मणून दक्षिण अमेरिकेच्या कांठाजवळ एक बेट आहे तेथें तो जायास निघाला, आणि ज्यून महिन्याच्या नवव्या तारिखेस तेथें जाऊन पोंचला. तेथून तो अझोरिस् बेटांस गेला. नंतर ज्यूले महिन्याच्या तिसाव्या तारिखेस तो प्लीमौथ बंदरास सुखरूप येऊन पोंचला; तेव्हां इंग्लंड देश सोडून त्यास तीन वर्षें अठरा दिवस झाले होते. इतक्या काळांत तो भिन्न भिन्न हवेच्या देशांत फिरला, तथापि त्याचीं चार मनुष्यें मात्र गमावलीं, पैकीं दुखण्यानें तर एकच मरण पावलें.

---

# अठरावा संध्याकाळ.

रखमाबाई—, कपूतानकूक ह्याच्या प्रथम जलप्रवासांत जशा चमत्कारिक व उपयोगी गोष्टी घडल्या, तशा दुसऱ्या प्रवासांत घडल्या नाहींत; ह्याचें कारण, मला वाटतें सहज सांगतां येईल.

रामचंद्र—, त्याचा अर्धा अधिक काळ समुद्रांत, आणि मनुष्याच्या वस्तीपासून फार दूर जे अक्षांश, तेथें गेला. ह्याजकरितां पासिफिक् महासागरामध्यें वेगवेगळ्या बेटांत बहुतकाळ पर्यंत राहिल्यामुळें, अनेकप्रकारच्या संकटयुक्त कृत्यांकडून त्याचा पहिला जलप्रवास फारच मनोरंजक झाला, तसलीं अघटित कृत्यें करण्याची संधी दुसऱ्या वेळीं आली नाहीं.

आनंदराव—, तथापि दुसरा जलप्रवास फार उपयोगी आहे; तो बहुत दक्षतेनें केला, व ज्या मोठ्या गोष्टीचा निर्णय करण्याकरितां कूक साहेबास पाठविलें होतें, ती गोष्ट अगदीं शेवटास गेली. दक्षिणेकडे एक महाद्वीप आहे असें ज्यांचें मत होतें, त्या सर्वांस तें खोटें असें आतां वाटूं लागलें.

कृष्णाचार्य—, आणखी एक्या गोष्टीविषयीं तो फार उपयोगी पडला. तो असा; ह्या जलप्रवासाच्या पूर्वीं दर्यावर्दी लोकांचे जीव संरक्षण करण्याची जी फार गुणावह रीति तिजविषयीं नौकागमन कर्ते ह्यांची व स्वतः कूक साहेबाची देखिल भलतीच समजूत पडून गेली होती. परंतु ह्या वेळेस ह्या गोष्टीकडेस कपूतानकूक ह्यानें अति उत्कंठेनें व संतत लक्ष्य दिलें, ह्यामुळें तीनवर्षांहून अधिक दिवसपर्यंत जरी समुद्रांत होता, तथापि एकशें

अठरा मनुष्यांपैकीं, असकें एक मनुष्य मात्र दुखण्यानें मरण पावलें, अशी गोष्ट कालच रामचंद्रानें सांगितली त्यावरून, आपल्या मनुष्यांची शरीर संपत्ति संरक्षित करणें, हें त्याचें कार्य सिद्धीस गेलें, ही गोष्ट पुरती सिद्ध होते.

रामचंद्र—, सरकारची कृपा, व आश्रय, हीं प्राप्त होण्याविषयीं ह्या सर्व गोष्टी इतक्या यथार्थपणें व बळकटपणें अनुकूळ झाल्या कीं, तो परत आल्यावर लोकरच त्यास पोस्टक्यापटन ह्याची जागा मिळाली, आणि ग्रीनिच येथील इस्पिताळावर ही त्यास कपतान नेमिलें; ह्या दुसऱ्या अधिकाराबद्दल त्यास कांहीं द्रव्य प्राप्ति नव्हती, परंतु त्यानें केलेले कष्ट व चाकरी ह्याबद्दल सन्मानरूप इनाम मिळावें ह्मणून ही जागा त्यास दिली होती.

गोपाळ—, त्याला जीं प्रतिष्ठा सूचक महत्वें मिळालीं त्यांत रायल सोसेटी ह्यांनीं तो आपल्या समुदायाचा साथी केला, हें एक महत्व त्यास प्राप्त झालें. त्यानें आपल्या खलाशी लोकांच्या शरीर संपत्तीचें रक्षण करण्याविषयीं ज्या युक्ति केल्या, त्यांचा वृत्तांत त्या सोसेटीस लिहून पाठविला, त्याबद्दल इनाम ह्मणून शर्गाडफ्री कापली ह्याचें सोनेरी पदक त्यास देण्याविषयीं ही त्या सोसेटीनें संमति दिली. अनुभवीक गोष्टीचें जो उत्कृष्टवृत्त लिहून पाठवून देईल त्यास प्रतिवर्षीं हें पदक देत असत; आणि ह्या प्रसंगीं तें पदक कपतानकूक ह्यास दिलें ही फार शाहाणपणाची व न्यायाची गोष्ट केली.

रामचंद्र—, परंतु, तो शूर सरदार तिसऱ्या जलपर्यटनास गेल्यावर, हें

गुणाचें प्रतिष्ठित चिन्ह त्यास दिलें; त्याचें वर्तमान त्यास मरण पर्यंत समजलें नाहीं, ही गोष्ट मनांत आणायास दुःख वाटतें.

कृष्णाचार्य —, तथापि त्याला जें पदक मिळालें, त्याविषयीं तो योग्य आहे, असें त्याच्या निघण्याच्या पूर्वीच ठरलें होतें ह्यांत भ्रांति नाहीं. तें पदक प्रत्यक्ष कूकसाहेबाच्या बायकोचे हवाली केलें होतें.

यमुना —, कपूतानकूक ह्याच्या प्रथम जलपर्यटनाचा वृत्तांत प्रसिद्ध झाला, तो डाकृतर हाक्स्वर्थ ह्यानें तयार केला. परंतु दुसऱ्या पर्यटनाचा वृत्तांत कोणीं लिहिला बरें?

आनंदराव —, डाकृतर हाक्स्वर्थ ह्याच्या ग्रंथावर शंका येऊं लागल्या, ह्मणून दुसऱ्या जलप्रवासाचा वृत्तांत लिहिण्याचें काम आपण स्वतः करण्याविषयीं कपूतानकूक ह्यानें निश्चय केला. आणि फार योग्य अशा रीतीनें त्यानें तो वृत्तांत लिहिला. त्याच्या स्वभावाच्या सरणी प्रमाणेंच त्याच्या लिहिण्याची सरणीही इतकी बाळबोध, साधी, आणि प्रौढ, होती कीं, कूक साहेबापेक्षां जो पुरुष अलंकारांत अधिक निष्णात असेल, त्यासही प्रायः त्या कथेस अधिक शोभा आणवली नसती. कपूतानकूक हा तिसऱ्या जलप्रवासा करितां इंग्लंड देशाहून निघाल्यावरही कांहीं काळपर्यंत ह्या जलप्रवासाचा वृत्तांत छापिला नव्हता. परंतु रेवरेंड डाकृतर डोग्लास (नंतर सालिसबरीचा बिशप) ह्या नामेंकरून एक विद्वान् गृहस्थ कपूतानकूक ह्याचा अमोलिक मित्र होता; त्यानें तो वृत्तांत छापण्याविषयीं पुढें देखरेख ठेविली.

कृष्णाचार्य —, दक्षिणेकडेस एक महाद्वीप आहे ह्याविषयींचा वाद आतां

राहिला नव्हता, परंतु नौकागमनोपयोगी जी भूगोलविद्या तत्संबंधी एक गोष्ट संदिग्ध होती, तिचें निराकरण करणें हें मात्र एक कांहींसें अगत्याचें किंवा वजनदार असें काम राहिलें होतें.

**रखमाबाई** —, ह्मणजे, वायव्यदिशेस अतिउत्तर अक्षांशांजवळ **अट्लांटिक्** आणि **पासिफिक्** ह्या दोन महासागरांच्या मध्यें एक मार्ग आहे, असा लोक तर्क करीत होते, ह्या गोष्टी विषयीं तुह्मी ह्मणतां असें मला वाटतें.

**कृष्णाचार्य** —, होय, ह्याविषयींच मी ह्मणतों. असा मार्ग खचित आहे असें बहुत विख्यात भूगोलवेत्त्यांचें मत होतें; आणि असा मार्ग आहे कीं नाहीं ह्याविषयीं झाल्या तर निर्णय करावा, ह्मणून उत्तर अमेरिकेच्या समुद्र कांठाचा शोध, होईल तितक्या अचुक रीतीनें बराबर करण्याचा **ब्रिटिश** सरकारानें निश्चय केला. हें एक साहस कर्मच होतें, कारण तें परम विस्तीर्ण व त्यांत अनेक प्रकारचे प्रसंग प्राप्त व्हायाचे, ह्मणून असलें काम सिद्ध करायास मोठा दक्ष, कुशळ आणि अनुभव घेतलेला, असा मनुष्य पाहिजे होता. तेव्हां ह्या कार्याचा मुख्य भाग शेवटास नेण्याविषयीं **कप्तान कुक** हा सर्वांपेक्षां उत्कृष्ट योग्य होता, ह्याविषयीं कोणासही शंका घेववली नाहीं. त्यानें त्या कामाचा अधिकार पतकरावा अशी सर्वांस उत्कंठा झाली, तथापि त्याविषयीं त्याजपाशीं बोलायास एकाचेंही धैर्य झालें नाहीं; कां कीं, विद्या आणि नौकागमन शास्त्र, ह्यांविषयीं त्यानें मागेंच ज्या उपयोगी गोष्टी केल्या, व क्लेश आणि संकटें जीं त्यानें पूर्वींच अनुभविलीं होतीं, तीं इतकीं पुष्कळ व मोठीं होतीं कीं, नव्या संकटाच्या कामांत पडण्याविषयीं त्यास ह्मणणें ही गोष्ट यथान्याय नाहीं असें सर्वांस वाटूं लागलें. तथापि अशी योजना कर-

ण्याचें किती अगत्य आहे हें त्याच्या समक्ष बोलून दाखविणें मात्र जरूर झालें. तेव्हां त्यानें लागलेंच अति उत्कंठेनें तें काम करायाचा पतकर स्वसंतोषें घेतला.

आनंदराव—, भूगोला भोंवतीं ज्यांनीं पूर्वीं नौकेंत बसून प्रदक्षिणा केल्या होत्या, ते सर्व केप्‌ आफ्‌ गुडहोपचे बाजूनें युरोपास परत आले होते; पण हल्लीं एशिया व अमेरिका ह्यांच्या मधील अति उत्तर अक्षांशांजवळून परत यावयाचें काम कप्तानकूक ह्यास सांगितलें. ह्यास्तव नूतनदेश शोधा याची जी नेहमीची रीति, तिचा ह्यावेळीं पालट झाला.

यमुना—, हें कार्य अत्यंत श्रमाचें होतें. व कप्तान जेम्स व दुसरे, ह्यांनीं पूर्वींच जीं दुःखें अनुभविलीं होतीं, त्यांवरूनही ह्या कामांत मोठें संकट भोगावें लागेल असें दिसून आलें होतें.

गोपाळा—, कप्तानकूक हा सर्व गोष्टी पुरतेपणीं जाणून होता, परंतु इतक्या अगत्याचे कामास होईल तितकी मदत करायास संकटें अथवा अड-चणी ह्यांच्या भयानें मागें सरणारा असा तो पुरुष नव्हता. रेसोल्यूशन नामक व डिस्कव्हरी नामक अशीं दोन जहाजें जलप्रवासार्थ लागलींच तयार केलीं, व तर्क चालेल तेथ पर्यंत सरंजामाची वगैरे सर्व प्रकारें अगदीं सिद्धता केली. रेसोल्यूशन नामक जहाजाचा अधिकार कप्तानकूक ह्यास दिला, व दुसऱ्याचा कप्तान क्लार्क ह्यास दिला. मागील जलप्रवासा-च्या वेळीं जे कामदार व मनुष्यें रेसोल्यूशन जहाजावर पाठविलीं होतीं तींच हल्लीं त्याजकडे लावून दिलीं, व पूर्वीं अडवेंचर जहाजावर जशी नेमणूक केली होती, तशीच सांप्रत डिस्कव्हरी जहाजावर केली

आनंदराव—, राजानें मुद्दाम हुकूम केल्यावरून उपयोगी जनावरांचा

एक समुदाय गलबतावर घेतला, तीं जनावरें ओटेहीट बेट पासिफिक् सागरांतील दुसरीं बेटें येथील लोकांस द्यावीं, असा राजाचा परोपकारी विचार होता, ही एक गोष्ट येथें सांगणें अवश्य आहे. त्या समुदायांत, मुख्यत्वें एक बैल, वांसरासुद्धां दोन गाई, आणि कितीएक मेंढरें होतीं. आणि त्याच उदार-कृत्या करितां युरोपांतल्या बागेंतील बीं कामा पुरतें कपूतान कूक त्याज बराबर दिलें, तेंनवीनशोधून काढलेल्या देशांत एक अमोलिक लाभच होईल, कारण तेणेंकरून तेथें ज्या शाक भाज्या उपजत असतील त्यांस आणखी नव्या खायाच्या पदार्थांची भर पडेल असें वाटलें होतें, तसेंच बोर्ड आव् अडमिराल्टी ह्मणजे अरमार खात्याची व्यवस्था पाहाणारी मंडळी, तिच्या हुकुमावरून दुसरे बहुत पदार्थ कपूतानकूक याच्या हवालीं केले, त्यांच्या योगानें दुसऱ्या गोलार्धांतील लोकांच्या स्थितीची अनेक प्रकारें सुधारणूक होईल असें अनुमान केलें होतें.

रामचंद्र —, सोसेटी बेटांत त्या जहाजांचा वरवा करण्याचा बेत होता ह्मणून ओमिया यास स्वदेशीं परत नेऊन घालण्याची एवढीच संधी आहे, ती हातांतून दवडूंनये असा बेत ठरला. त्याप्रमाणें तो कप्तान कूक त्याजबरोबर ज्यून महिन्याच्या चोविसाव्या तारिखेस लंडन शहराहून निघाला. जेव्हां तो चालता होऊं लागला तेव्हां त्यास शोक व संतोष एक कालींच झाले. इंग्लंड देशांत त्याजबराबर लोकांनीं चांगली वर्तणूक केली ती त्याच्या मनास फारच लागली, व तो देश आणि तेथील लोक हे फार मान्य आहेत असें त्यास वाटलें. तथापि आपल्या देशांत ज्या पदार्थांस अमोलिक भांडारें असें मानितील, ते पदार्थ पुष्कळ बराबर घेऊन स्वदेशास

परत जाण्याचा आनंदकारक संभव आतां आला आहे, तसेंच ह्या भांडाराच्या सत्तेमुळें स्वदेशीयलोकांत आपणास मोठी श्रेष्ठता मिळेल, अशी फार आशा त्यास उत्पन्न झाली. अशा प्रकारचे विचार त्याच्या मनांत येऊं लागल्यामुळें त्याचें सर्व दुःख हळूहळू कमी होऊं लागलें.

ह्या जलप्रवासाचा सारांश म्यां तयार केला आहे, पण आज संध्याकाळीं तो सगळा वाचायास फारच लांब आहे, ह्याजकरितां अर्धा आजवाचून बाकी अर्धा उद्यां संध्याकाळा करितां ठेवायास मी मोकळीक घेतों.

खालीं लिहिल्या प्रमाणें तो वाचायास लागला:—

**कपूतान कूक** त्यानें जहाजांत बसून पृथ्वी भोंवतीं
तिसरी प्रदक्षिणा केली तिची गोष्ट.

**रेसोल्यूशान** आणि **डिस्कवरी** हीं दोन्हीं जहाजें एकच कामावर नेमिलीं होतीं, तरी तीं **इंग्लंड** देशाहून एकवेळींच निघालीं नाहींत. सन् १७७६ रांत, **कपूतानकूक** हा **रेसोल्यूशान** जहाजांत बसून ज्यूलैच्या बाराव्या तारिखेस **प्लीमोथ** येथून निघाला, व **कपूतान क्लार्क** हा **डिस्कवरी** जहाजांत बसून आगष्टच्या पहिल्या तारिखेस निघाला. पुढें नोवेंबरच्या आरंभाच्या सुमारास **केप् आव् गुडहोप्** येथें ह्या दोन्ही जहाजांचा मिलाफ झाला. तेथें **कपूतानकूक** ह्यानें गुरें, घोडीं, मेंढरें, बकरीं, ससे, आणि ग्रामपक्षी, हे विकत घेऊन, त्याजपाशीं जीं जनावरें होतीं त्यांत ह्यांची आणखी भर घातली. हीं सर्व, आणि तेव्हां जहाजावर जीं जनावरें होतीं त्यांपैकीं बहुत करून, अशीं **ओटेहीट न्यूझीलंड** आणि दुसरीं बेटें ह्यांजकरितां योजिलीं होतीं.

डिसेंबर महिन्याच्या आरंभाच्या सुमारास केप येथून तीं जहाजें निघालीं; आणि सफरकरणाऱ्यांनीं आग्नेयी दिशेचा मार्ग धरिला असतां, लौकरच हवा थंड झाली अशी कीं कितीएक बकरीं व कांहीं मेंढरें हीं मरण पावलीं.

डिसेंबरच्या बाराव्या तारिखेस दोन बेटें दृष्टीस पडलीं, त्यांत जें मोठें होतें तें घेरांत सरासरी पंचेचाळीस मैल होतेंसें दिसण्यांत आलें. त्यांच्या मधील खाडींतून जहाजें गेलीं. त्याबेटांतील जमीन इतकी बरड होती कीं, उत्कृष्ट दुरभिंगाच्या मदतीनें देखिल त्यांतून एकावरही कोणत्याही जातीचें झाड झुडूप आढळलें नाहीं. त्यांचे समुद्रकांठ थंड आणि खडकाळ होते, व मधील प्रदेशांत बहुतकरून रूक्ष डोंगर होते, त्यांचीं शिखरें व बाजू बरफानें झांकून गेल्या होत्या. ह्या बेटांस आजपर्यंत नांवें दिलीं नव्हतीं, म्हणून कपूतान कूक यानें आपल्या राजाचा चवथा मुलगा, केंट प्रांताचा माजी ड्यूक, नामें एडवर्ड ह्याच्या सन्मानार्थ "प्रिन्स एडवर्डाचीं बेटें" असें त्यांचें नांव ठेविलें.

ह्या गोलार्धांत आतां उन्हाळा जरी मध्यावर आला होता, तरी हिंवाळ्याच्या भरामध्यें इंग्लंडांत जशी तीक्ष्ण हवा बहुधा अनुभवास येते, तशीच येथें होती. तथापि ह्या गोष्टीमुळें धीर न सोडितां कप्तान कूक आणखी पुढें दक्षिणेस चालिला, येथपर्यंत कीं, फ्रान्स देशचा नौकाध्यक्ष नामें एमूडीकग्यूलन् यानें थोड्या वर्षांपूर्वीं जी जमीन शोधून काढिली होती, तिच्या अक्षांशांत तो येऊन दाखल झाला. येथें चांगलें बंदर आहे कीं नाहीं ह्याची चौकशी करावी, असें ही कपूतान कूक यास

सरकारी हुकूम मिळाला होता त्यांत होतें. त्या कर्ग्यूलन्सूल्यांड नामक बेटास तो चोविसाव्या तारिखेस जाऊन पोंचला, व दुसऱ्या दिवशीं जमीनीवर उतरला. येथील सर्व समुद्रकांठा बहुतकरून पेनूग्विनूस् व दुसरेपक्षी आणि सील्स यांकडून भरून गेला होता. गोडेंपाणी इतकें विपुळ होतें कीं, दरखांचरांत मोठाला ओहोळ होता, परंतु एखादें झाडझुडूप अथवा त्याची खूण देखिल दृष्टीस पडली नाहीं. पण थोडेंसें निळवट मात्र होतें. जहाजावर येण्याच्या पूर्वीं, तेथून तो देश पाहावा म्हणून तो खडकांच्या एक्या रांगेवर चढला. ते खडक बदामीघाटाच्या तार्ळीमरबान्या प्रमाणें एकाव्यावर एक असे होते. परंतु ही देशाचें अवलोकन करण्याविषयीं त्याची इच्छा पूर्ण झाली नाहीं, कारण, शिखराजवळ जाण्याच्या पूर्वींच तेथें इतकें दाट धुकें आलें कीं, पुनः खालीं येण्यास देखिल रस्ता सांपडणें त्यास कठीण पडलें.

जहाजांचा येथें मुकाम होता तों पर्यंत हवा धुकट होती, व ह्या अवघ्या कांठ्यां भोंवतीं जहाजांतून फिरणें परमसंकटाचें होतें, असें असतांही, कप्तानकूक ह्यानें आपणास आज्ञा झाल्या प्रमाणें, त्याच्या दरएक विभागाचा तपास अतिसूक्ष्मपणानें केला. तें बेट पराकाष्ठेचें बरड होतें, इतकें कीं, त्या अक्षांशवृत्तारवालीं जितकीं स्थळें आजपर्यंत सांपडलीं होतीं त्यांतून एक्याही स्थळांत स्थावर जंगमपदार्थांचा वृत्तांत लिहिणारास, येथल्या प्रमाणें अल्पविषय कधीं मिळाला नाहीं. सफर करणाऱ्यांनीं येथें जीं झाडें पाहिलीं त्यांची संख्या सर्व मिळून सतरा अठरांहून जास्ती नव्हती, ह्या संख्येंतच, कित्तीएक प्रकारचें शेवाळ तेथें

होतें तेंही धरिलें. एमूडीकर्ग्यूलन् ह्याचें नांव त्या बेटास दिलें होतें, ही त्या फ्रेंच नाविकाची प्रतिष्ठा नाहींशी करावी अशी कपूतान कूक ह्याची इच्छा नव्हती, नाहीं तर त्यानें त्या बेटास उजाडबेट असें नांव ठेविलें असतें.

न्यूझीलंड येथें आपणास आणखी पाणी मिळेल, व लांकडें घेतां येतील, आणि गुरां करितां गवत वाळवून घ्यावयास सांपडेल, ह्मणून कपूतानकूक ह्यानें कर्ग्यूलन् बेटाहून निघून न्यूझीलंडचा रस्ता धरिला. तेव्हां गुराढोरांची संख्या बरीच घटली होती; कारण कर्ग्यूल नूसूल्यांड ह्या बेटाचा शोध करण्याच्या कामांत जहाजें लागलीं असतां दोन आंडील बैल, एक गोजी, दोन मेंढे व कितीएक बकरे, अशीं मरण पावलीं.

सन १७७७ ांतील ज्यानेवारीच्या चोविसाव्या तारिखेस व्यान्डीमनूसूल्यांड ह्या नांवाच्या बेटाचा कांठा सफर करणाऱ्यांनीं पाहिला, तों पर्यंत त्यांस ध्यानांत धराया जोगी कांहीं गोष्ट घडली नाहीं. दोन दिवसां नंतर जहाजें नांगरिलीं, आणि कपूतानकूक ह्यानें नावा बाहेर काढावयास सांगितलें, आणि आवश्यक पदार्थ मिळायास जी जागा फार सोई-ची असेल तिचा शोध करावा, ह्मणून तो स्वतां एक्या नावेंत बसून गेला.

एक्या दिवशीं इंग्लिश लोक लांकडें तोडायाच्या कामास लागले असतां त्यांस तेथील कांहीं लोक भेटले, त्यावरून त्यांस संतोष व सुख वाटलें. ते आठ दादले व एक पोरगा असे होते; ते निर्भयपणेंच केवळ नव्हे, तर परम विश्वासानें आणि मोकळेपणें जवळ आले. त्यांतून एकापाशीं मात्र एक

हत्यार होतेंसें दिसलें, परंतु तें सुमारें दोन फूट लांब व एक्या शेवटाकडेस चोंचावलेली अशी काठी होती. ते अगदीं नग्न होते, आणि शरीराच्या वेगवेगळाल्या भागावर टोंचून कांहीं मोठालीं छिद्रें पाडिलीं होतीं, त्या खेरीज दुसरे कांहीं अलंकार त्यांनीं धारण केले नव्हते. त्यांतून बहुतेकांनीं डोकीचे केंस व दाढी ह्यांस तांबडें रोगण चोपडिलें होतें, व कितीएकांनीं तर तेणेंकरून तोंडें ही रंगविलीं होतीं. कपुतान कूक ह्यानें त्यांस ज्या ज्या वस्तू बक्षीस दिल्या त्यांपासून त्यांस संतोष झाला, असें अगदीं दिसून आलें नाहीं. ह्यानंतर दादले व पोरगे मिळून सुमारें वीस असामी कपुतान कूक व त्याच्या समागमें जे लोक आले होते, त्यांस येऊन मिळाले. त्यांतून एकेकास कपुतान कूक ह्यानें एकेक मण्याची माळ, व एकेक पदक, असें दिलें; तें त्यांनीं कांहीं संतोषानें घेतलें. लोखंड व लोखंडी हत्यारें ह्यांची त्यांस कांहीं चहा नव्हती. व माशांच्या गळाचा उपयोग कसा करावा हेंही त्यांस ठाऊक नव्हतें ही गोष्ट सप्रमाण आहे. तसेंच पाण्यांत जावया करितां एखादी नाव अथवा होडी त्यांपाशीं पाण्यांत आली नाहीं. प्राचीन युरोपीयन कवींनीं ह्मटलें आहे कीं फ्रांन्स्* आणि सेटर्स+ हे झाडाच्या टोलींत राहातात, हें ह्मणणें व्यानूडी मनूस् ल्यांड येथें प्रत्ययास आलें. तें असें, झाडीकडून आच्छादित अशीं काटक्यांचीं कांहीं दरिद्री घरें, ज्यांस झोपडीं हें देखील नांव शोभत नाहीं, अशीं समुद्राच्या कांठापाशीं पाहाण्यांत आलीं.

---

* फ्रान्स ह्मणजे ग्रामदेवतें, + व सेटर्स ह्मणजे मद्यदेवतेचे चाकर, त्यांस शिंगें आहेत व ते अर्धे मनुष्य व अर्धे बकरें असे आहेत.

खरीं पण तीं किंचित् काळपर्यंत काम होतें ह्याकरितांच उभीं केलीं होतीं असें दिसलें. त्यालोकांचीं अतिसुखकारक राहायाचीं स्थळें जीं होतीं, तीं मोठाल्या झाडांच्या योगानें त्यांस प्राप्त झालीं होतीं. त्या झाडांचीं खोडें साहा सात फूट उंची पर्यंत विस्तवाच्या योगानें पोंखर केलीं होतीं, त्यांत मातीची चूल ठेवून तिज भोंवतीं तीनचार माणसें बसाया पुरती जागा असे. थोडे दिवस पर्यंत येथें कपूतानकूक ह्याचा मुकाम होता, तितक्या काळांत, विद्या व नौकागमनशास्त्र ह्यांच्या ज्ञानाची वृद्धि करणाऱ्या ज्या गोष्टी त्या करण्याविषयीं त्यानें उपेक्षा केली नाहीं.

संन १७७७ सालांतील ज्यानेवारी महिन्याच्या तिसाव्या तारिखेस तो व्यानडीमन्सल्यांड येथून निघाला, आणि सुमारें पंधरादिवसां नंतर न्यूझीलंड बेटांतील त्याचें पूर्वील मुकामाचें ठिकाण चार्लटराणीची खाडी हें होतें, तेथें जाऊन त्यानें गलबत नांगरिलें. तेव्हां व्यर्थ काळक्षेप होऊं नये ह्मणून उत्कंठित होऊन त्यानें त्याच दुपारीं आपलीं कामें सुरू केलीं. कितीएक रिकामीं पिंपें होतीं तीं लागलींच जमिनीवर नेलीं; आणि दोन वेधशाळा उभ्याकराया करितां, व पाहाऱ्याचे शिपायांस आणि बाकीच्या मंडळींतून ज्यांस कांठावर राहाण्याचें काम लागेल त्यांस राहाया करितां तंबू पाहिजेत ते उभे करण्याकरितां, जमीन साफ करायास आरंभ केला. सफर करणाऱ्यांस नांगर टाकून फारवेळ झाला नाहीं, तों तेथील लोकांकडून भरलेल्या अशा बहुत होड्या जहाजापाशीं आल्या; परंतु जहाजावर जाण्याविषयीं त्यांतून थोडक्यांसच धीर झाला; हें फार विलक्षण दिसलें. कारण, कप्तानकूक हा त्या सर्वांस पक्का ठाऊक होता; व मागें तो आपल्या बराबर किती उदारपणें,

वागला, हें ते विसरले नव्हते.

न्यूझीलंड येथील लोकांस अशी शंका येण्याचें एक कारण वास्तविक होतें, तें सांगतों. पूर्वींच्या जलप्रवासांत कपूतान कूक व कपूतान फर्नोक्स ह्यांची शेवटील चुकामुक पडल्यावर कपूतान फर्नोक्स हा चार्लट राणीच्या खाडीस गेला होता, तेव्हां त्याच्या खलाशी लोकांपैकीं कितीएकांस भयकारक प्रसंग प्राप्त झाला, तो असा, जहाजावरील मंडळीकरितां रानांतून पानें आणायास दहा माणसें एक्या लौकर चालणाऱ्या मोठ्या नावेंतून पाठविलीं होतीं, त्यांचा तद्देशीय लोकांबराबर तंटा होऊन तीं ठार मारलीं गेलीं, त्यांतून एकही गडी वर्तमान सांगण्यास देखिल उरला नाहीं, ह्यामुळें तो तंटा होण्यास कारण काय झालें तें समजण्यांत आलें नाहीं. असो, ह्या गोष्टीचें स्मरण न्यूझीलंड येथील लोकांस होतें, व त्याचा हे सूड उगवितील हा धाक होता, ह्मणून सांप्रत ते इंग्लिशांच्या जहाजांत जाण्यास भिऊं लागले. ह्याकारणास्तव मित्रपणा चालू ठेवण्याविषयीं व मागें घडलेल्या गोष्टीवरून तुह्मांस कांहीं उपद्रव पोंचणार नाहीं ह्याविषयीं प्रयत्नें करून त्यांची खात्री करायाचें कूकसाहेबास अगत्य पडलें. असो, तशी त्यांची खातरजमा झाल्यावर लागलेच ते पुनः मित्रपणानें वागूं लागले.

इकडे जहाजें नीट करायाचें, आणि खाण्याचे पदार्थ पैदा करण्याचें, काम मोठ्या झपाट्यानें चालविलें होतें; व खलाशीलोक इतके निरोगी होते कीं, दोनही जहाजांच्या अजारी पटावर असके दोन असामी मात्र रोगी ह्मणून लागले होते.

आपल्या गुरां करितां वैरण जमाकरायास **कपुतानकूक** हा फेरी करण्याकरितां गेला होता, त्या वेळीं स्वदेशीय लोकांचा असा शोकास्पद परिणाम झाला ह्याचीं कारणें कोणतीं, त्याचा लागेल तितका खराशोध लावायास त्याला संधी सांपडली, तेव्हां **ओमाई** हा त्याचा दुभाष्या झाला होता. शोधांतीं समजलें कीं, कांहीं चोऱ्या झाल्या त्यांमध्यें तद्देशीयलोक सांपडले, ह्यापासून हा तंटा उत्पन्न झाला. खून करायाची मसलत पहिल्यानें ठरली होती असें कांहीं नाहीं. त्या चोरीचा सूड घेण्यास दुर्दैवें करून घाई केली ह्मणून असें झालें, नाहीं तर ही वाईट गोष्ट घडली नसती.

**कपुतानकूक** ह्याची ही **न्यूझीलंडबेटास** शेवटली खेप, ह्या वेळीं त्यानें एका तद्देशीय नाइकास एक बकरा बकरी व करडूं असें दिलें, व दुसऱ्या नाइकास एक डुकर व डुकरीण अशीं दिलीं; ह्यां खेरीज आणखीही जनावरें येथें सोडावीं असें त्याच्या मनांत होतें; परंतु त्यांचें पाळण करण्यापुरतें ज्यास सामर्थ्य आहे असा एकही नाईक त्यास मिळेना, ह्मणून त्यानें तो बेत सोडून दिला.

ह्या जलप्रवासांत **न्यूझीलंड** येथील उपज व तेथील लोकांच्या रीतीभाती ह्यांविषयीं आणखीविशेष माहितगारी झाली. परंतु सांप्रत त्याचें वर्णन करूं गेलों तर फारवेळ लागेल. फेब्रुवारीच्या चोविसाव्या तारिखेस **कप्तान कूक** हा ईशानी दिशेच्या रस्त्यानें चालता झाला; आणि सुमारें सवा महिन्यानंतर, सरासरी वीस दक्षिण अक्षांशांत एक बेट आहे तेथें जाऊन पोंचला. तेथील लोक त्या बेटास **वाटीऊ** असें ह्मणत होते. ह्या बेटाचा घेर सुमारें अठरा मैल आहे. तें एक फार रमणीय स्थळ आहे;

तेथें डोंगर व मैदानें आहेत, त्यांवर हिरवीचार निळवट आहे, तिच्या वेगळ्या वेगळ्या रंगांमुळें तर ती फारच चमत्कारिक दिसते. तेथील राहाणाऱ्यांची संख्या फार होती व त्यांतून बहुतलोक चांगले रूपवान होते. **रेसोल्यूशन** जहाज कांठाजवळ जातांच त्यांपैकीं कितीएक आपल्या होड्यांत बसून आले, आणि तिघेजण जहाजावर जाण्यास वळले. तेथें तों पर्यंत त्यांनीं जी वर्तणूक केली तिजवरून पाहातां ते सुखानें होते, व आपणास धरून ठेवितील किंवा आपणाशीं वाईट वर्तणूक करतील, असें त्यांस भय वाटलें नाहीं असें दिसून आलें. ह्यानंतर आणखी कितीएक तद्देशीयलोक जहाजावर गेले होते. गृहस्थांपैकीं तिघेजण **ओमाई** ह्यास बराबर घेऊन कांठावर गेले. तेथें घोळका जमला होता त्यामध्यें **सोसेटी** बेटांत राहाणारे असे तीन असामी स्वदेशीय पाहून **ओमाई** ह्यास आश्चर्य वाटलें. **सोसेटी** बेटें व **वाटीऊ** बेट ह्यांच्या मध्यें अंतर बहुतकरून साहाशें मैल होतें, ह्याजकरितां ते **इंडियन्** लोक येथें कसे आले ह्याविषयींची कथा अद्भुत आहे, ती अशी, बारावर्षा मागें बायका व पुरुष मिळून सुमारें वीस असामी नावेंत बसून जवळच **युलिटिआ** बेटास जात होते, त्याकाळीं एक मोठें तुफान झालें तेणेंकरून ते आड वाटेला धकावत गेले, आणि त्यांजपाशीं खाण्याचा सरंजाम थोडा होता, त्यामुळें त्यांस अतिशय संकट भोगावें लागलें. तेव्हां त्यांपैकीं बहुतेक मनुष्यें भुकेनें व शीण होऊन मरण पावलीं, चारपुरुष मात्र उरले. त्यासमयीं ती नाव पालथी झाली, तेव्हां त्या उरलेल्यांचाही निरुपायपणें नाश होण्याचा समय आला. तथापि नावेच्या बाजूस धरून ते लोंबत राहिले; असे

कितीएक दिवस लोटल्यावर ते ह्या देशांतील लोकांच्या दृष्टीस पडण्यांत तरंगत आले, तेव्हां ह्यांनीं लागल्याच होड्या पाठवून त्यांस कांठावर आणिलें. तीन पुरुष उरले होते त्यांनीं, आपल्या बरोबर ह्या लोकांनीं ममतेनें वर्तणूक केली ह्मणून, फार कृतज्ञता दाखविली; आणि सांप्रतच्या स्थळीं ते फार संतोषानें होते, इतकेकीं, त्यांस त्यांच्या देशास परत नेऊन चालायाचें बोलणें लाविलें असतां त्यांनीं त्याचा नकार केला.

अतिउत्तर अक्षांशांकडेस पासिफिक् महासागराचा तपास करावा, हा ह्या जलप्रवासाचा मुख्य उद्देश होता, हें पूर्वीं सांगितलें आहे परंतु उलटावारा व दुसऱ्या प्रतिकूळ गोष्टी, ह्यांच्या योगानें जहाजें चालण्यास ह्या वेळपर्यंत इतका प्रतिबंध झाला कीं, ह्या वर्षीं त्या अक्षांशांकडेस जाणें हें कप्तानकूक ह्यास अशक्य झालें. पुढें लौकरच पर्जन्यकाळही चालू झाला. व जहाजें कोरडीं राखणें मुळीं अशक्य होतें, त्यांत हवा उष्ण असून ओलसर झाली होती. ह्यामुळें त्याच्या लोकांच्या शरीर संपत्तीस फार इजा पोंचेल असें भय उत्पन्न झालें. तथापि त्यांच्या आरोग्याकडे त्यानें इतकें फार आणि शहाणपणानें लक्ष्य पुरविलें कीं, दोहों पैकीं एक्या जहाजावरही आजून एक देखिल मनुष्य आजारी पडलें नव्हतें. मेच्या पहिल्या तारिखेस जहाजें अनामुका येथें येऊन पोंचलीं. आणि लागलाच तेथील लोकां बराबर मित्रपणाचा व्यवहार चालू झाला. अनामुका येथील नाईक नामें टूबाऊ ह्यानें, तसेंच टंगाटेबू व दुसरीं जवळचीं बेटें येथील नाइकांनीं, कप्तानकूक ह्याचें पराकाष्ठेचें आगतस्वागत केलें. अनामुका येथीले लोकांचा स्वभाव चोरटा होता, ह्यामुळें मात्र मित्रपणाच

विघ्न झालें. चोरीच्या कामांत हे लोक किती निपुण होते, हें पाहायाची संधी येथें बहुतवेळ आली. हें कर्म आपल्या मोठेपणास योग्य नव्हे असें कित्येक नाइकांस देखिल वाटलें नाहीं. त्यांतून एकजण जहाजांतून एक अर्गळ आपल्या चिरगुटा खालीं लपवून घेऊन जात होता, इतक्यांत धरला. तेव्हां **कपतान कूक** ह्यानें त्यास बारा फटके मारून शिक्षा केली, आणि तो आपल्या मुक्तते करितां एक डुकर आणून देई पर्यंत त्यास बंदींत ठेवलें होतें. त्याउपर पदवीच्या मनुष्यांपासून चोरीचा उपद्रव सफर करणाऱ्यांस झाला नाहीं; परंतु त्यांचे चाकर किंवा दास ह्यांचें तें काम अझूनही चालू होतें. त्यांस फटके मारणें हें डोलखांबास फटके मारल्या प्रमाणें होतें. शेवटीं **कपतान क्लार्क** ह्यानें शिक्षा करण्याची एक नवीच युक्ति काढिली, तिजपासून गुण होईल असें वाटलें. ती अशी; चोरांस न्हाव्याच्या हवालीं करून त्यांकरवीं त्यांचीं डोकीं अगदीं भादरून टाकीत. अशाकृत्यामुळें ते आपल्या लोकांत उपहासास्पद झाले, व **इंग्लिश** लोकांस येणें करून ते तत्क्षणीं ओळखूं येऊं लागले, ह्मणून त्यास ते जवळ येऊं देईनातसे झाले, ह्या प्रकारें त्यांस पुनः चोरी करायास संधी मिळेनाशी झाली.

**अनामुका** बेटांतील खायाचे पदार्थ सरले, ह्मणून थेट **टंगाटोबू** येथें जावें, असा **कूकसाहेबानें** अकराव्या तारिखेस विचार केला, परंतु एका नाइकानें तो बेत फिरविला; त्यानें आग्रहानें शिफारस केली कीं, तेथें जाण्यापेक्षां वायव्यदिशेकडेस एक बेटांचा समुदाय आहे त्यास **हपाई** असें ह्मणतात तेथें जावें हें बरें. त्यावरून तो तेथें गेला; तेव्हां तेथील लोकांनीं पराकाष्ठेच्या स्नेहभावानें त्याची भेट घेतली.

हपाई येथें सफरीलोकांचा मुक्काम होता तों पर्यंत, इंग्लिश व इंडियन ह्यांमध्यें परस्परांस नजराणे देणें, आदर सत्कार करणें, आणि समारंभ करणें, ह्यांत सर्वकाळ गेला. गदायुद्ध, जेठींच्या कुस्त्या, बायकांच्या झोंब्या, पुरुषांचे नाच, व रात्रीं गाणी आणि नाच, हीं तद्देशीय लोकांनीं दाखविलीं. इकडे इंग्लिश लोकांनीं आपल्या जहाजावरील शिबंदीलोकांकडून कसरत कराविली, तेणेंकरून इंडियन लोक खुष झाले, आणि दारूकामें दाखविलीं, तीं पाहून त्यांस आश्चर्य वाटलें. उभयपक्षीं मौज पाहाण्याविषयींची हौस पुरती झाल्यावर कप्तानकूक त्यानें तें व आसपासचीं बेटें ह्यांचा तपास करण्याचा उद्योग स्वतां चालविला. पुढें तो अनामुका येथें परत गेला, तेव्हां मार्गांत एक वाळूसर व खोलवट असें बेट आहे त्याच्या भोंवतीं फुटक्या लाटा असतात, त्या बेटावर लागून जहाज फुटण्याची पुनः संधी आली होती, पण थोड्यानें चुकली.

हपाई बेटांत कप्तानकूक होता तेव्हां त्यास फ्रेन्डली ऐलस् ह्मणजे स्नेही बेटें ह्यांचा राजा नामें पालेहो ह्याच्या भेटीस नेलें होतें. त्या राजानें कप्तानकूक त्यास टंगाटेबू येथें येण्याविषयीं आमंत्रण केलें, तें मान्य करून, ज्यूनच्या दहाव्या तारिखेस कूकसाहेब टंगाटेबू येथें गेला. तेथें त्याची भेट घेण्या करितां समुद्राच्या कांठीं तो राजा वाट पाहात होता. तेथून त्यास एक लहानच पण निटस अशा घरीं नेलें; आणि तुमचा ह्या बेटांत मुक्काम आहे तों पर्यंत तुमचें राहाण्याचें ठिकाण हेंच असें त्यास सांगितलें. तें घर कांहींसें रानांत होतें व त्याच्या पुढें एक सुंदर व मोठें असें अंगण होतें, असें कीं, ह्यापेक्षां दुसरी चांगली

जागा मिळाली नसती. कपूतानकूक येथें आल्यानंतर हपाई बेटां तल्या सारिखें येथेंही समारंभांचा क्रम चालू झाला, परंतु हे समारंभ कांहीं प्रकार वेगळे होते व त्यांत डामडौल विशेष होता, परंतु तेथील कितीएक लोकांनीं चोऱ्या केल्या ह्यामुळें कधीं कधीं ह्या रंगांत विरस झाला. चोंहींकडून येऊन ते सफरी लोकांचे जिन्नस चोरून नेऊं लागले. तें कांहीं केल्यानें बंद होईना. आणि ते चोरीचें काम पराकाष्ठेच्या धिटाईनें व दांडगाईनें करीत असत.

कपूतानकूक ह्यानें ह्या बेटावर निरनिराळ्या जातींचीं कितीएक जनावरें सोडिलीं, आणि त्यांचे पाळण कसकसें केलें पाहिजे ह्याविषयींची रीति त्याच्यानें समजून सांगवेल तितकी त्यानें तेथील नाइकांस सांगितली.

फ्रेनुडुली बेटामध्यें त्याचें राहाणें एकंदर तीनपासून चार महिने पर्यंत झालें; इतक्या काळांत (कांहीं प्रसंगोपात्त कलह झाले ते खेरीज करून) तद्देशीय लोक व इंग्लिश ह्यां मध्यें पराकाष्ठेचें सौरस्य चाललें होतें. जहाजावरील लोकांस स्नेहभावाच्या व्यवहारापासून साक्षात उपयोग तर झालेच, परंतु त्यांखेरीज पासिफिक महासागराच्या ह्या भागाच्या भूगोलविद्यासंबंधी ज्ञानाची इतकी वृद्धि झाली कीं, पुढें जे नौकागमन करते झाले त्यांस तिजपासून फार उपयोग झाला. कपूतानकूक ह्यास जें वर्तमान लागलें त्यावरून पाहातां, हा आर्चिपिलेगो ह्मणजे द्वीपसमूह, फार विस्तीर्ण आहे असें दिसतें. तद्देशीय लोकांनीं दीडशांवर बेटें मोजिलीं. त्या बेटांचा विस्तार व संख्या, हीं दाखवायाकारितां निरनिराळ्या आकृतींच्या पानांचे तुकडे ते लोक कामांत घेत असत.

ज्यूलैच्या सत्राव्या तारिखेस कपूतानकूक हा सरत्या शेवटीं फ्रेन्ड्ली बेटांहून निघाला, आणि सुमारें तीनवारांनीं तो ओटेहीट बेटास येऊन पोंचला. ओमाई ह्याची स्वदेशीय लोकांबरावर जी पहिली भेट झाली ती अगदीं वर्णनीय नव्हती; कारण कितीएक लोक जहाजावर आले होते त्यांनीं त्यास वळखिलें, त्यांमध्यें त्याचा मेहुणा होता, त्याच्या भेटींत कांहीं ममतेचा प्रकार विशेष आढळण्यांत आला नाहीं. परंतु ओमाईची आणि त्याच्या बहिणीची भेट झाली, त्याकाळीं पराकाष्ठेचें प्रेम दृष्टीस पडलें, तसेंच त्याच्या आतेची भेट झाली त्यासमयीं ती म्हातारी बाई त्याच्या पायां पडली, तेव्हां तिच्या आनंदाश्रूंकडून त्याचे पाय भिजून गेले.

संन१७७४ रांत कपूतानकूक ओटेहीट बेट येथें आला होता, त्यावर स्पेन देशाचीं दोन जहाजें येथें येऊन त्यालोकांनीं कांहीं डुकरें, कुतरीं, बकरीं, एक आंडील बैल, आणि एक मेंढा, इतकीं जनावरें येथें सोडून दिलीं असें कपूतानकूक ह्यास समजलें. त्या जहाजांवरील कामदार, व खलाशी ह्यांनीं इतकी चांगली वर्तणूक केली, होती कीं, ते फार मान्य व थोर होते, असें त्यांजविषयीं येथील लोकांनीं बोलून दाखविलें.

त्या बेटाचा राजा ओटू ह्मणून होता, तो कपूतानकूक ह्यास येऊन भेटला आणि उभयतांची पुनः मैत्री झाली. ती मैत्री निर्विघ्नपणें चालली, आणि आदर सत्कार, चांगलीं कामें, व समारंभ, हीं एकामागून एक नेहेमीं चालू होतीं, त्यांमुळें ती दृढ झाली. जहाजावर जीं युरोपांतील

जनावरें होतीं त्यांची व्यवस्था लावावी असा कपुतान कूक ह्याचा मुख्य बेत होता. त्याप्रमाणें, ओरी ह्मणून ओटू राजाचें राहोयाचें स्थळ होतें तेथें एक मोर व एक लांडोर, एक तुर्की कोंबडा व त्याच जातीची कोंबडी, एक हंस व तीन हंसी, एक बदक व चार बदकिणी, अशीं तो घेऊन गेला. ओटू ह्याच्या घरीं कितीएक बकरीं व स्पेनदेशाचा बैल हीं पहिलींच होतीं, त्यांच्या भरतीस कपुतान कूक ह्यानें आपल्या जहाजावरील तीन गाई व स्वतांचा एक आंडील बैल, अशीं पाठवून दिलीं; तसेंच जहाजावर जीं मेंढरें अद्याापि राहिलीं होतीं तींही देऊन टाकिलीं.

माणसाचा बळी देणें, हा एक ओटेहीट बेटांतील धर्माचा भाग आहे, ह्याचें यथार्थ प्रमाण ह्या खेपेस सफर करणाऱ्यांस मिळालें. ह्या जातीचा एक समारंभ खचित त्यांनीच प्रत्यक्ष पाहिला. त्याचा क्रम कपुतान कूक ह्यानें सविस्तर लिहिला, तो संताप आणि तिरस्कार ह्यांच्या योग्य अभिप्रायें करून वर्णिला आहे. त्यानें ह्मटलें आहे कीं, "पासिफिक् सागरांतील बहुत बेटांत ही दारुण चाल चालू आहे ह्मणून भय वाटतें. फ्रेनूड्ली बेटांत तर मला ह्याविषयींचा विशेष दाखला मिळाला."

मारेवाई अखातांत सफरी लोकांचा मुकाम होता, तेव्हां एका दिवशीं कपुतान कूक व कपुतान क्लार्क हे दोघेजण घोड्यांवर बसून मध्यदेशांत गेले. तेव्हां ओटेहीट बेटांतल्या लोकांनीं असलीं जनावरें पूर्वीं कधीं पाहिलीं नव्हतीं ह्मणून त्यास परम आश्चर्य वाटलें, आणि आणो ते सेनूटारस ह्मणजे नराश्व (ज्याचें अर्धें शरीर घोड्याचें व अर्धें माणसाचें असतें ते) हे आहेत कीं काय? ह्मणून विस्म

याने ह्या गृहस्थांकडेस ते टकमक पाहूं लागले. युरोपीयन प्रवाशांनीं अपूर्व अपूर्व पदार्थ ह्या लोकांत नेले होते ते सर्व पाहून, दूरदेशच्चे लोक हे परम श्रेष्ठ आहेत असें त्यांस जें वाटलें होतें त्यापेक्षांही ह्या वेळीं ते फारच श्रेष्ठ वाटले.

**कपूतानकूक** ह्याच्या कमरे पासून तो पायांपर्यंत वायूनें कळ लागली होती, ती ज्या युक्तीनें बरी झाली, ती युक्ति लिहाया जोगी आहे,ती अशी, **ओट** ह्याची आई, तिघी बहिणी, व दुसऱ्या आठजणी बायका, ह्या मुद्दाम त्याच्यो दुखण्यांत उपाय करण्या करितां जहाजावर गेल्या. तेव्हां **कपूतानकूक** ह्यानें त्यांचें स्नेहभावाचें ह्मणणें मान्य केलें. आणि जहाजाच्या खोलींतील तक्तपोशीवर याच्या करितां बिछाना पसरून त्या सांगतील त्या प्रमाणें करायास तो राजी झाला. तेव्हां त्यांनीं त्यास आपल्यामध्यें निजायास सांगितलें, आणि त्यांच्या भोंवतीं जितक्या जणीस बसायास सांपडलें तितक्या जणींनीं दोहों दोहों हातांनीं डोक्यापासून पायांपर्यंत त्याचें अंगबविशेषें करून जेथें कळा लागल्या होत्या तें ठिकाण, इतकें रगडिलें कीं, त्याचीं हाडें वाजूं लागलीं, आणि त्याचें मांस केवळ मेण होऊन गेलें. ह्या प्रमाणें पावतास पर्यंत रगडणें झाल्यावर त्या बायकांनीं त्यास सोडिलें ह्मणून त्यास संतोष वाटला. परंतु त्या रगडण्यामुळें लागलेंच त्यास बरें वाटलें. असें कीं, निजायास जाण्यापूर्वीं आणखीं एकदां रगडून घेण्यास त्यानें धीर केला. त्या योगानें असें झालें कीं, सर्व रात्रभर त्यास बरेंच चेन पडलें. त्याच्या वैद्यणींनीं तें आपलें औषध दुसऱ्या दिवशीं सकाळीं व पुनः संध्याकाळीं ही दिलें, तेव्हां त्याच्या

कळा अगदीं दूर होऊन तो निरवालस बरा झाला.

**ओटेहीट** बेटाच्या त्या खेपेस, सफरकरणारे व तद्देशीयलोक, ह्यांच्या मध्यें इतकी अकृत्रिम मैत्रीविश्वास बसला होता कीं, एक ही अप्रियगोष्ट घडून त्यांत विघ्न झालें नाहीं. **ओटेहीट** येथून **कप्तान कूक** तेराव्या तारिखेस जवळच **ईमीओ** ह्मणून बेट होतें, तेथें जायास निघाला. त्याबेटांत जीं कामें झालीं तीं बहुतकरून अप्रिय होतीं. दोनवेळां दोन बकरीं चोरीस गेलीं, त्यावरून तेथीललोकांशीं शत्रुत्वाची वर्तणूक करणें **कप्तानकूक** ह्यास प्राप्त झालें. अकटोबरच्या अकराव्या तारिखेस **हाहीन** बेटाच्या पश्चिमेच्या बाजूस एक बंदर होतें त्यांत जहाजें येऊन पोंचलीं.

ज्या ठिकाणाहून **ओमाई** ह्यास नेलें होतें त्याच जाग्यावर त्याची स्थापना करणें, हें **कप्तानकूक** ह्याचें **हाहीन** बेटांतील मोठें काम होतें. अनेक प्रकारचे सत्कार केल्या नंतर समुद्रकांठाजवळ एक्या जमीनीच्या तुकड्याचा अधिकार त्यास दिला; आणि एक लहानसें घर जहाजावरील सुतारांनीं त्यास बांधून दिलें; असें कीं, युरोपांतील जे पदार्थ त्याच्या स्वाधीन होते ते त्यानें त्यांत संभाळून ठेवावे. तसाच त्यास एक बाग करून दिला; त्यामध्यें चकोतरे, द्राक्षीवेल, अनानसें, खरबुजें, आणि बहुतप्रकारच्या उपयोगी वनस्पतींचें बीं, हें लाविलें. **कप्तानकूक** हा त्याबेटांतून जाण्याच्या पूर्वींच तीं सर्व चांगल्या स्थितींत आलीं होतीं तीं पाहून त्यास समाधान वाटलें. जेव्हां घर बहुत करून तयार झालें आणि बहुत चीजवस्ता कांठावर आणिल्या तेव्हां खेळाच्या जिनसांची एक पेटी तेथें जम-

लेल्या **इंडियन** लोकांनीं पाहिली त्यावरून त्यांस जसें आश्चर्य वाटलें तसें त्याहून अधिक उपयोगी पदार्थ पाहून वाटलें नाहीं. भांडीं, हांडे, ताटें, तगटें, प्यायाचे प्याले, गलासें, आणि सर्व घरगुती सरंजामाचा खटला हा आपल्या हिशेबीं फार उपयोगी व आवश्यक आहे, परंतु **ओमाई** त्याच्या देशाच्या लोकांतून एकानेंही त्याकडेस ढुंकूनही पाहिलें नाहीं. सांप्रतच्या स्थितींत **इंग्लिश** सामान कांहीं मोठ्या उपयोगास पडायाचें नाहीं असें **ओमाई** ह्यास ही वाटल्यावरून त्यानें तें शहाणपणानें जहाजावरील लोकांस विकून त्याबद्दल कुऱ्हाडी, व दुसरीं लोखंडी हत्यारें जीं येथें फार मोलवान होतीं तीं घेतलीं. एक बंदुक, एकसंगीन, व एक तोसदान, तसेंच एक शिकारीची बंदुक, चार पिस्तुलें, आणि दोन तीन तरवारी, इतकीं युरोप खंडांतील हत्यारें त्यास दिलीं. हीं युद्धोपयोगीं शस्त्रें जवळ बाळगायास मिळालीं ह्मणून त्यास फार आनंद झाला. ह्याविषयीं त्यास मनापासून इच्छा होती ती पूर्ण करावी एवढ्याच हेतूस्तव **कपूतानकूक** हा तीं त्याला बक्षीस देण्यास प्रवृत्त झाला. नाहींतर अग्निशस्त्रावांचून राहाणें हेंच **ओमाई** ह्यास हितकारक होय असें **कपूतानकूकास** वाटलें होतें कां कीं, अज्ञानपणें त्यांचा उपयोग केला तर त्याचें महत्व राहाणें एकीकडे राहून उलटें त्यास संकट वोढवेल.

संन १७७७ यांतील नोवेंबरच्या दुसऱ्या तारिखेस **ओमाई** ह्यानें फार मायाळूपणें **इंग्लिश** लोकांपासून सरत्या शेवटची रजा घेतली. तेव्हां त्यास फार गहिंवर आला, परंतु त्यानें शूरपणाचा निश्चय सोडिला नाहीं.

[illegible]

जाऊन पोंचली. येथें कांहीं काळपर्यंत राहावें, असा सफरीलोकांचा बेत होता म्हणून कांठावर तंबू उभे केले. सुमारें दहादिवस लोटल्यावर जहाजावरील शिबंदी पैकीं एक असामी तंबूपाशीं पाहारा करीत उभा होता, त्याला तेथील लोकांनीं लालूच दाखविली त्यावरून तो चाकरी सोडून गेला. कप्तान कूक ह्यानें बहुत प्रयत्न करून त्यास परत आणिलें. ह्यानंतर, डिस्कवरी जहाजावरील एक मिड्शिपूम्यान (एक कामदार असतो) आणि एक खलाशी असे दोघे जण नाहींसे झाले; आणि आपलीं बाकी राहिलेलीं आयुष्यें ह्याच आवडत्या बेटांत घालवावीं, अशी दुसऱ्याही किती एक असामींची मनःपूर्वक इच्छा आहे, असें कप्तानकूक ह्याच्या समजण्यांत आलें. किती ही अवघड पडलें तरीं ह्या सोडून जाणारांस परत आणणें. हें अति आवश्यक झालें. तेव्हां कडक उपायाची योजना केली, ती अशी; ओरीओ म्हणून पुलीटीआ बेटाचा मुख्य अधिकारी होता; त्याचा मुलगा, मुलगी, आणि जांवई ह्यांस त्यानें बंदींत ठेविलें; आणि निरोपा वांचून चाकरी सोडून जाणारे हे हस्तगत होत तों पर्यंत तुमचा सुटका व्हायाची नाहीं, असें त्यांस सांगितलें, ह्या योगानें अभीष्ट कार्य झालें. त्या दोन मनुष्यांस त्यांनीं परत आणून दिले, आणि पुनः तसली गोष्ट करण्याविषयीं त्यांनीं उद्योग केला नाहीं.

सोसेटी बेटांतील एक बेट बोलाबोला म्हणून होतें तेथें शेवटीं कप्तानकूक गेला; कारण, फ्रेंच नौकागमन वेत्ता एमूडीबोगेनूबिल ह्यानें ओटेहीट बेटांत आपला नांगर गमाविला होता, तो नांगर बोलाबोला बेटांत नेला होता, म्हणून तेथील राजा ओपूनी ह्या

पासून तो हस्तगत करून घ्यावा, हा त्या बेटास जाण्याचा **कपूतान कूक** ह्याचा मुख्य हेतु होता. नांगराची गरज होती ह्मणून **कपूतान कूक** ही खरेदी करायास उत्सुक झाला असें नाहीं; परंतु त्याच्या जवळील जिनसांचा सांठा अगदीं खपत आला होता ह्मणून, तो नांगर मोडून त्याचे नवे व्यापारोपयोगी जिन्नस करावे असें त्याच्या मनांत होतें. **कपूतानकूक** ह्यानें बोलणें लाविलें होतें तें सिद्धीस गेलें; आणि तो नांगर स्वाधीन केला ह्मणून **ओपूनी** ह्यास त्यानें पुष्कळ इनाम दिलें.

दक्षिण समुद्रांतील राहाणारे ह्यांस उपयोगी जनावरें पुरवावीं ह्या विषयीं **कूकसाहेब** शेवट पर्यंत उत्सुक होता. **स्पाजियार्ड** (स्पेनदेशचे लोक) ह्यांनीं **ओटेहीट** बेटांत मागें एक मेंढा सोडून दिला होता तो **बोलाबोला** येथें होताच. तेथें आतां त्यानें **केपूआफ़गुडहोप** येथून आणिलेली एक मेंढी कांठवर आणून सोडिली; आणि अशा देणगीच्या योगें मेंढ्यांची संतती पुढें वाढेल अशी आशा उत्पन्न होऊन त्यास संतोष झाला. **युलीटिआ** येथें त्यानें मागेंच **ओरिओ** ह्याच्या देखरेखी खालीं, **इंग्लंड** देशांतील एक डुकर व एक डुकरीण आणि दोन बकरीं अशीं सोडून दिलीं होतीं.

डिसेंबरच्या बाराव्या तारिखेस सफर करणारे तर शेवटीं सोसैटी बेटांपासून निघाले. बहुतवेळां ह्या बेटांस जाणें झालें त्यावरून, तेथील धर्म संबंधी, राजकीय, आणि घरगुती, असे कायदे व रीतीभाती ह्यांचें ज्ञान ह्या वेळेस इत्थंभूत अवश्य झालें असावें, असें कोणास वाटलें असेल. त्यास, सांप्रतच्या जळप्रवासांत नवें ज्ञान बहुत प्राप्त झालें ह्यांत भ्रांति नाहीं; तथापि

कपूतानकूक ह्यानें ह्मटलें कीं, "मीं त्यांचा वृत्तांत लिहिला तो कितीएक भागांत आझून अपुर्ता आहे; आणि तेथें जे अतिअगत्याचे कायदे चालू होते, त्यांपैकीं पुष्कळ मला आझून माहीत नाहींत."

कपूतानकूक ह्यास इंग्लंडाहून निघाल्यास सत्रा महिने झाले, इतक्या काळांत एकंदर पाहतां जरी त्यानें कांहीं निरर्थक कामांत वेळ घाल-विला असें नाहीं, तथापि तो जाणून होता कीं, त्याला जी आज्ञा होती तिच्या मुख्य उद्देशाविषयीं तर त्याच्या जलप्रवासाचा प्रथम दिवसच होता, आणि ह्या कारणास्तव, आपल्या लोकांच्या संरक्षणाचा व मोहिमीचा उद्देश सिद्ध होण्याच्या उपयोगी ज्या गोष्टी होत्या त्यांविषयीं नवें लक्ष्य दिलें पाहिजे, ह्याविषयीं तो सावध होता. ह्मणून सोसैटी बेटांत असतां, खाण्याच्या पदार्थांची काय अवस्था आहे तिची त्यानें चौकशी केली, आणि तेथून निघून पूर्वीं त्यानें शोधून काढिलेल्या ठिकाणांच्या पलिकडे जातांच जहाजावर जो सुतारांचा व नाडे, दोर, नांगर, वगैरे गलबतांचा सरंजाम होता तो किती व कसा आहे हें पुरतें समजावें ह्मणून त्यानें त्याची तपासणी करायाचा हुकूम केला, कारण कीं, हें समजलें असतां त्यांचा अति उपयोगी कामाकडेस विनियोग कसा करावा ह्याचा समज पडेल.



# एकुणिसावा संध्याकाळ.

## कपूतानकूक ह्यानें जहाजांत बसून पृथ्वी भोंवती तिसरी प्रदक्षिणा केली, त्या कथेची पुरवणी.

संन १७७७ रांतील डिसेंबरच्या बाविसावी व तेविसावी ह्या तारखांच्या मधल्या रात्रीं, दोनशें तीन अंश व पंधराकळा इतक्या पश्चिमरेखांशांत जहाजें मध्यरेषा वोलांडून गेलीं. ते सफर करणारे आणखी उत्तरेकडेस चालिले, आणि संन १७७८ रांतील जानेवारी महिन्याच्या अखेरीस ते एका बेटांच्या समुदायाजवळ जाऊन पोंचले. त्या बेटांस पुढें, **कपूतानकूक** ह्यानें आपला मित्र व आश्रय देणारा असा **स्यांड्विचचा अर्ल**, ह्याच्या सत्कारार्थ **स्यांड्विच् बेटें** असें नांव दिलें. तो अर्ल ह्यावेळीं **अरमाराचा** मुख्य सरदार होता. त्यांपैकीं एक्या बेटाकडेस ते गलबत हाकारून गेले, तों तेथील कितीएकलोक होड्यांत बसून कांठापासून निघाले, आणि ते जहाजांजवळ आले तेव्हां, **ओटेहीट** व दुसरीं आलीकडे जीं बेटें लागलीं तेथील भाषा हे लोक बोलतात असें पाहून सफरीलोकांस आश्चर्य आणि संतोष झाला. हे लोक प्रथम जहाजावर जावयास भिऊं लागले, परंतु त्यांतून कितीएकजण धीर करून जहाजावर गेले, आणि तेथें त्यांनीं जे पदार्थ पाहिले त्यांवरून त्यांस इतकें आश्चर्य झालें कीं, तितकें होतांना **कपूतानकूक** ह्यानें पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें.

बरोबर नावा देऊन एका कामदारास पाण्याचा शोध करण्याकरितां एक्या बेटाकडेस पाठविलें त्याबेटास तेथीललोक **आटूई** असें ह्मणत होते. येथें तो जमीनीवर उतरायाचा उद्योग करूं लागल्यावरून तेथीललोकांच्या टोळ्या इतक्या आल्या, आणि बर्ल्या, बंदुका, इत्यादि फार काय सांगावें, जें जें त्यांस उचलायास सांपडलें तें तें

लुचाडून घेण्याविषयीं ते इतकें बळकरूं लागले कीं, त्यांवर बारकरणें त्यास भाग झालें. त्यांत एक मनुष्य मारला गेला. जहाजें नांगरिलीं तेव्हां कपूतानकूक कांठावर गेला, आणि तो जमीनीवर उतरत आहे इतक्यांत तेथें जे लोक जमा झाले होते ते पालथे पडले, त्यांस खुणाकरून उठवीपर्यंत ते तसेच पडले होते, दुसऱ्या दिवशीं डुकरें आणि फळें ह्यांज रितां व्यापार सुरूकेला, तेव्हां तेथील लोकांनीं तीं देऊन त्यांबद्दल खिळे, व कांहींसे फिं कऱ्या सारिखे घडलेले लोखंडाचे तुकडे, घेतले. पाणी मिळायास तर अगदींच हरकत झाली नाहीं, उलटें त्यालोकांनीं पाण्याचे तळ्यापर्यंत पिंपें लोटीत लोटीत न्यावयास व तेथून परत आणायास इंग्लिशांना मदत केली. तसेंच जेंजें मेहनतीचें काम त्यांस सांगितलें, तें तें त्यांनीं ताबडतोब केलें.

ह्याप्रमाणें कपूतानकूक ह्याच्या संतोषानुरूप कामकाज चालले असतां तो रेसोल्यूशन जहाजावरील शस्त्रवैद्यनामें अणूडरसनसाहेब, व नकाशे काढणारा वेबरसाहेब त्यांस बरोबर घेऊन देशांत फेरीकरायास गेला. त्यांत जें जें लिहायाजोगें दृष्टीस पडेल तें तें लिहून ठेवण्यांत जसा अणूडरसनसाहेब चांगला कुशळ होता, तसाच त्यांचे नकाशे काढण्याविषयीं वेबरसाहेब ही कुशळ होता. कपूतानकूक हा परत आला तेव्हां, डुकरांचीं पोरें, कोंबडी, आणि कंद, ह्याजकरितां मोठ्या व्यवास्थितपणानें आणि झपाट्यानें व्यापार चालविला होता, व तद्देशीय लोकांनीं त्यांत कांहीं ठकबाजी किंवा चोरी, ही करायाचा उद्योग केला नाहीं, हें पाहून त्यास संतोष झाला. पहिल्यानें त्यांचा चोरी करण्याचा स्वभाव दिसून आला, परंतु चोरी केली असतां शिक्षा झाल्यावांचून राहायाची नाहीं, अशी त्यांची

खात्री झाली, त्यामुळें ते अगदीं वाटेवर आले. त्यांनीं अदलाबदल करायास ज्या जिनसा आणिल्या होत्या, त्यांत एक विजातीय कफणी व टोपी होती, ती ज्या देशांत लोक पोषाकाकडेस फार लक्ष्य देतात, त्या देशांत देखिल सुंदर अशी मोजली जाण्याजोगी होती. त्या कफणीस तांबड्या व पिंवळ्या पिसांनीं सुशोभित केलें होतें; तीं पिसेंही फार सुंदर होतीं व त्यांच्या नवेपणामुळें व ताजेपणामुळें तर तीं फारच साजरीं झालीं होतीं.

येथें जहाजांचा मुकाम थोडे दिवस होता, तितक्यांत तेथील राहाणारे हे मनुष्याचें मांस खाणारे आहेत असा निर्णय झाला. परंतु लढाईत मारलेले जे शत्रु, त्यांजविषयींच केवळ ही दुष्टचाल चालते असें समजण्यांत आलें. कप्तानकूक व हे लोक ह्यांची अणखी चांगली वळख पडल्यावर ह्या लोकांचा स्वभाव ओटेहीट बेटांतील लोकांप्रमाणें अतिचंचळ नव्हता, आणि दक्षिणसमुद्रांतील दुसऱ्या कितीएक बेटांतल्या कितीएक लोकांच्या सारिखा फार गंभीरही नसून ते लोक बहुतकरून मनाचे मोकळे व आनंदी होते, असें दिसून आलें. ते जे जिन्नस तयार करीत असत त्यांत त्यांचें कौशल्य फार होतें. त्यांच्या मासे धरण्याच्या कितीएक अंकड्यांचा आकार व सफाईही फार चांगली होतीं. युरोपखंडांतील कारागिरांस ज्ञान आणि हत्यारें ह्यांचें विशेष आनुकूल्य आहे, तरीं त्यांतून एकाऱ्यानेंही त्यांवर तोड करवणार नाहीं. शेतकी संबंधी जें त्यांच्या पाहाण्यांत आलें, त्यावरून तें कसबही त्यांस माहीत होतें, तसेंच वनस्पतीच्या उत्पन्नाचें परिमाण व चांगुलपणा ह्यांस जसा जमीनीचा स्वाभाविक सुपीकपणा कारण होता, तसेंच त्यांस कृषिकर्माविषयींची कुशलताही कारण होती, ह्याविषयीं त्यांस पुरतें प्रमाण मिळालें.

ज्या द्वीपसमुदायास कपूतानकूक यानें स्यांडविचूबेटें असें नांव ठेविलें, त्यांपैकीं पांच बेटांचीं मात्र त्यावेळीं त्यास माहितगारी झाली. त्या बेटांस तेथीललोक ओआहू, अटूही, ओरीहवा, आणि टाहूरा असें ह्मणत होते. स्पानियार्ड लोकांस पूर्वींच हीं बेटें सांपडलीं असतीं, तर त्या लोकांनीं अशा उत्तमस्थळापासून निःसंशय फायदा करून घेतला असता, आणि अकापल्को येथून मनीला येथें वर्षास त्यांचीं जहाजें जातात त्यांस विसांवा देण्याच्या कामांत त्यांनीं तीं स्थळें लाविलीं असतीं. तसेंच अमेरिका व टीनीयन् ह्यांच्या मध्यें अर्ध्यारस्त्यावर बेटांचा समुदाय आहे, असें जर लार्डआनूसनू ह्यास समजलें असतें, तर त्यास फार बरें झालें असतें. त्याला जें जें पाहिजे होतें तें सर्व येथें मिळतें, आणि बहुतप्रकारचे क्लेश जे त्यास प्राप्त झाले ते टळले असते.

फेब्रुवारीच्या दुसऱ्या तारिखेस सफर करणारे उत्तरेकडेस चालिले; त्या जाण्यांत ज्या गोष्टी घडल्या त्या बहुतकरून सर्व, नौकागमनशास्त्रसंबंधी होत्या. मार्चाच्या सातव्या तारिखेस न्यूआलबियन् ह्याचा कांठा दृष्टीस पडला, त्या काळीं जहाजें चवेचाळीसअंश व तेहतीस कळा इतक्या उत्तर अक्षांशांत आणि दोनशें पस्तीस अंश वीस कळा इतक्या पूर्वरेखांशांत होतीं. अमेरिका खंडाच्या पश्चिमबाजू सरसींच जहाजें चालविलीं, तेव्हां भूशालाका व जमीनीचीं टोंकें हीं कितीएक दृष्टीस पडलीं, त्यांस कपूतानकूक यानें नांवें दिलीं. शेवटीं एकुणतिसाव्या तारिखेस एक्याखाडींत जहाजें नांगरिलीं, त्या खाडीस तद्देशीयलोक नुट्का असें ह्मणत होते, ह्मणून कपूतानकूक यानें त्यास नुट्कासौंड असें नांव दिलें. ह्या खाडीच्या जवळील देशाचें स्वरूप पूर्वीं पाहिले-

त्या देशाहून फार निराळें होतें. तो देश फारच डोंगरावर होता; व त्या डोंगराचीं शिखरें बर्फानें झांकून गेलीं होतीं; परंतु डोंगराच्या मधील खोरीं व समुद्रकांठावरील जमीन येथें बऱ्याच रुंदीच्या कांठापर्यंत, उंच व सरळ अशीं झाडें होतीं. तेथील कांहीं लोक होड्यांत बसून जहाजांजवळ आले, परंतु जहाजावर येण्याविषयीं त्यांस इंग्लिश त्यांनीं वळविलें नाहीं. तथापि त्यांचा स्वभाव शांत, आणि त्यांस जें देऊं केलें, त्याबद्दल देण्यास जो पदार्थ त्यांजपाशीं असेल तो देण्याविषयीं ते फार उत्सुक होते, असें दिसलें; आणि लोखंडाविषयींची त्यांनीं फार इच्छा दाखविली, व त्या धातूचा उपयोग त्यांस पुरता माहित होता असें दिसून आलें. ह्यानंतर लौकरच नीटनेटका व्यापार सुरू झाला, तेव्हां त्यालोकांनीं जे विकाया करितां जिन्नस आणिले, ते आस्वल, लांडगे, कोल्हीं, हरणें, राकून, केंसाळमाजरें, मार्टिन, आणि विशेषेंकरून पाणमांजरें, ह्या जनावरांचीं कातडीं होतीं; तशींच कातड्याचीं केलेलीं वस्त्रें, व एक्या जातीच्या झाडाच्या सालीचीं केलेलीं दुसऱ्या तऱ्हेचीं वस्त्रें, आणि बहुत प्रकारचीं कारागिरीचीं कामें होतीं. तद्देशीय लोकांनीं आपले जिन्नस देऊन जे पदार्थ घेतले ते सुऱ्या, किंकरी, लोखंडाचे व कथलाचे तुकडे, खिळे, अरसे, बुतामे, किंवा कोणताही धातु, हे होते. व्यापार बहुतकरून परस्पर भलेपणानें चालला होता, हे चोर तर त्यांपेक्षांही फार भयंकर होते, कारण, त्यांपाशीं लोखंडाचीं तीक्ष्ण हत्यारें असत तीहींकरून, इंग्लिश लोक पाठमोरे होतांक्षणींच, जहाजाच्या नाड्यांमधून अंकडा अथवा चऱ्हाटापासून दुसरा एखादा लोखंडाचा तुकडा ते कापून घेत, आणि असलीं कामें करण्यांत त्यांची इतकी चपळाई होती कीं, मोठ्या सावधगिरीनें लक्ष्य ठेविलें तरीं वारंवार ते चुकवीत असत.

ह्या लोकांबरोबर व्यापार चालला होता, त्यांत ते धातूंखेरीज दुसरे कशाचा उदीम करीत नव्हते, आणि शेवटीं लोखंड सोडून पितळेविषयीं ते फार उत्कंठेनें शोध करूं लागले, इतकेकीं, शेवटीं सफर करणारे तें बेट सोडून गेले, त्यापूर्वीं ज्योतिषसंबंधी व दुसऱ्या यंत्रांत जें पितळ होतें तें खेरीजकरून जहाजांवर त्याधातूचा तुकडा देखिल बाकी राहिला नाहीं. सर्वशस्त्रांवर एक-ही बुताम राहूं दिलें नाहीं, खणाच्या पेट्यांवर कांही सरंजाम ठेविला नाहीं; तांब्याचे हांडे कथिलाचे डबे, मेणबतीचीं घरें, आणि त्या जातीचें जें जें सांप-डलें तें तें सर्व मोडून टाकिलें; त्यामुळें, त्या प्रवासांत जितकेलोक भेटले तितक्यांपेक्षां ह्या अमेरिकन लोकांस इंग्लिशांपासून तऱ्हे तऱ्हेच्या बहुत जिनसा मिळाल्या.

पुढील स्वारी करितां जहाजांची पुरती डागडुजी करावी, हें सांप्रतच्या ठिकाणीं सफर करणाऱ्यांचें मुख्य काम होतें, व हें काम चाललें असतां कप्तान कूक ह्यानें आसपासच्या कांठाचा प्रत्येक भाग तपासिला. तो देशव्यतेथील राहणारे, ह्यां विषयीं जितकें वर्तमान मिळवेल तितकें मिळविण्याविषयीं अनुडरसनूसाहेबाबरोबर त्यानें आपलें नेहमीचें बुद्धिपाटव व तत्परता दाखविली. त्यानें जो वृत्तांत लिहिला आहे तो चमत्कारिक आहे. कारण, दक्षिण महासागरांतल्यापेक्षां येथील उपज, निपज, लोक, आणि रीतीभाती, ह्या फार निराळ्या होत्या, त्यांचें त्यानें यथास्थित वर्णन केलें आहे.

सांप्रतच्या सारांशांत त्यालोकांचा संक्षिप्त वृत्तांतमात्र सांगतों, त्यापेक्षां अधिक सांगायास अवकाश नाहीं. त्यांचीं शरीरें बहुतकरून साधारण उंचीलाही कमीच व गांठींनी भरलेलीं पण लठ्ठ नव्हतीं. ते मनुष्याचें मास खाणारे

रवचित होते, तथापि त्यांचा स्वभाव निर्दय दिसला नाहीं. सफरकरणाऱ्यांस ते लोक कह्यांत राहाया जोगे, आर्जवी, व चांगल्या स्वभावाचे, असे दिसले. आपल्या कुटुंबाच्या निर्वाहार्थ भूमीवरील व समुद्रांतील जीवजंतु धरावे, किंवा मारावे हा त्या पुरुषांचा मुख्य धंदा होता; व ताग अथवा लोंकर ह्यांचीं वस्त्रें करणें किंवा दुसरें घरकृत्य पाहाणें हें काम बायका करीत होत्या.

सव्विसाव्या तारिखेस जहाजांची डागडुजी पुरी झाली तेव्हां कप्तान कूक हा नुट्कासौंड येथून निघाला. तो उत्तरेकडेस जाऊन पुनः स्यांडविच् बेटांकडेस माघारा आला, इतक्या फिरण्यांत ज्या गोष्टी घडल्या त्या बहुधा नौकाशास्त्रासंबंधी होत्या. परंतु ह्या लांब आणि उपयोगी अशा नौकागमनापासून थोड्या गोष्टी मात्र निवडून काढून सांगायास सांपडतील.

मेच्या बाराव्या तारिखेस एक्या खाडींत जहाजें नांगरिलीं, त्या खाडीस कप्तानकूक ह्यानें "राजपुत्र विलियम ह्याची खाडी" असें नाव दिलें. येथें नौकाशास्त्र व भूगोलविद्या ह्यासंबंधी शोध करायास त्यास अवसर सांपडला इतकेंच नाहीं, तर अमेरिकेच्या समुद्रकांठावरील लोकांविषयींची आणखी विशेष माहितगारी करून घेण्यास ही त्यास संधी मिळाली. समुद्रकांठाच्या ह्या भागांत राहाणारे लोक एस्किमाक्स आणि ग्रीनलंडर्स (ग्रीनलंडांतील लोक) ह्यां सारिखे बहुतकरून होते. होड्या, मासे धरायाचीं व पारध करायाचीं शस्त्रें, व हत्यारें, हीं ज्या पदार्थांचीं व ज्या आकृतीचीं ग्रीनलंडांत होतीं, त्याच पदार्थांचीं व त्याच आकृतीचीं येथें होतीं. विलियम राजपुत्राच्या खाडीच्या आसमंतात जीं जनावरें होतीं, तीं बहुतकरून नुट्कासौंड येथल्या सारिखीच होतीं. पाणकोंबडीं बहुत होतीं; परंतु तेथें जे मासे धरण्यांत आले ते बहुतकरून टार्स्क आणि हालीबट ह्या जातीचे मात

होते. वनस्पती थोडक्या होत्या. झाडें ह्मटलीं ह्मणजे मुख्यत्वें करून फरूस अ-थवा सरळ ह्यांच्याच निरनिराळ्या जाती होत्या. तेथें पोत व लोखंड हीं दोन्हीं होतीं, ही त्यालोकांविषयीं ध्यानांत धरण्याजोगी गोष्ट आहे. युरोपांतील लो-कांबरोबर ह्यालोकांचा साक्षात् व्यवहार ह्मटला ह्मणजे ह्या सफरकरणाऱ्यांशींच पहिल्यानें झाला, ही गोष्ट सप्रमाण आहे, तथापि ते पदार्थ कोणत्या तरीं सुधार-लेल्या लोकांपासून त्यांस प्राप्त झाले असावे. हड्सनूचें अखात, अथवा कानडा देशांतील सरोवरांच्या तीरांवरील संस्थानें येथून, अधिक मध्य दे-शांत राहाणाऱ्या लोकांच्या द्वारानें ते पदार्थ त्यांस बहुत करून मिळाले अस-तील.

हें अखात सोडल्यावर कांहीं दिवसांनीं ते सफरकरणारे एक्या खाडींत गेले. ती खाडी उत्तरेकडेस समुद्राशीं, अथवा पूर्वेकडेस बाफिन्च्या किंवा हड्-सनूच्या अखाताशीं, संबद्ध असेल असें त्यास वाटूं लागलें, ह्मणून तिची फार सूक्ष्मपणें व अगत्यानें तपासणी करावी असें झालें. परंतु तिजपासून जी आ-शा वाटली होती तीस कांहीं आधार नव्हता असें कप्तानकूक ह्यास लौक-रच वाटलें, तथापि त्याचा पुरता निर्णय करणें अवश्य झालें. त्याप्रमाणें तोंडा-पासून दोनशें दहा मैल पर्यंत त्या खाडीची पुरती तपासणी केली. त्यासमयीं, ज्या अतिमोठ्या नद्या माहित आहेत त्यांतीलच ती एक नदी आहे ह्याविषयीं चीं असंदिग्ध चिन्हें मिळालीं. ह्याखाडीचें वर्णन लिहितांना कप्तानकूक ह्यानें एक जागा कोरी ठेविली, व तेथें एखादें नांव घालून ती भरली नव्हती, ह्मणून जहाजें इंग्लंडास परत आलीं तेव्हां, स्यांडविच् ह्याचा अर्ल ह्यानें तीस "कूकची नदी" असें ह्मणायाची आज्ञा केली. ह्याविस्तीर्ण समुद्र कांठा

वरील राहाणाऱ्या लोकांबराबर लोंकरीचा व्यापार फार किफायतीनें चालेल असा निश्चय झाला; परंतु उत्तरेच्या आंगानें वहिवाटी जोग्या रस्ता असल्यावांचून ग्रेट् ब्रिटन् देशालाविशेष नफा खचितच होईल ही गोष्ट अशक्य, कां कीं, तो देश फार दूर पडला.

ज्यूनच्या साहाव्या तारिखेस सफरकरणाऱ्यांनीं कूकची नदी सोडिली. एकुणिसाव्या तारिखेस त्यांस लहानलहान बेटांचा एक समुदाय लागला; आणि ह्यानंतर दोन दिवसांनीं, पृथ्वीखंडावर कांहीं डोंगर मेघमंडळाहूनही फार उंच गेलेले असे होते ते त्यांनीं पाहिले; त्यांतून एकावर ज्वालामुखी होती तिच्या मधून काळ्याधुराचे लोट नेहमीं वर चालले होते. हा डोंगर केवळ सुक्का होता व ज्वालामुखी त्याच्या अगदीं शेंड्यावर होती.

सफरकरणारे पुढें चालिले, तों तिकडे धुकें इतकें दाट होतें कीं, त्यांस आपल्यापुढें शंभरवारही दिसेनासें झालें. तथापि हवा मध्यम होती म्हणून कपूतान कूक हा मार्गामध्यें थांबला नाहीं. परंतु शेवटीं, जहाजांच्या एकया बाजूस, खडकावर आपटून फुटणाऱ्या अशा लाटांचा अवाज ऐकूं आल्यावरून भिऊन त्यानें लागलेंच आपलें गलबत नांगरिलें, तसेंच डिसूकवरी जहाजही त्याच्या हुकुमावरून नांगरिलें. थोड्यातासांनंतर धुकें कांहींसें निवळलें तेव्हां, दोनही जहाजें फार मोठ्या संकटांतून वांचलीं असें दिसून आलें. तें असें, ज्या खडकांच्या मधून जावयाला कपूतानकूक ह्यास निरभ्र दिवसांत देखिल हिंमत झाली नसती, त्या खडकांमधून ईश्वरी सत्तेनें जहाजें काळोख असतां गेलीं, व अशा चांगल्या नांगराया जोग्या ठिकाणीं आलीं कीं, जर पसंत करण्याचें काम केवळ कूकसाहेबाच्याच स्वाधीन असतें तर त्यानें ख-

त्यांस तीच जागा निवडून काढिली असती.

सत्ताविसाव्या तारिखेस तीं जहाजें "ऊनालाश्का" ह्या नांवाच्या बेटास जाऊन पोंचली. तेथील लोकांनीं इतक्या माणुसकीनें व भलेपणानें वर्तणूक केली कीं, तितकी माणुसकी व भलेपणा रानटीलोकांत बहुत करून नसतो. युरोपीयनलोक व युरोपीयनलोकांच्या कितीएक रीति त्यांस माहीत होत्या असें त्यांच्या साधारण चालीवरून उघड दिसून आलें. तथापि त्यांची खाण्याची रीति युरोपांतील रीतीपेक्षां फार निराळी होती. एकादिवशीं कप्तान कूक हा समुद्रतीरावर फिरत असतां, तेथील बायका व पुरुष ह्यांची मंडळी गवतावर बसून कच्चें मांस खातां हेत असें त्यानें पाहिलें; आणि उत्तम मसाला घालून शिजविलेलें टर्बाट जातीचें मांस जितक्या रुचीनें इंग्लिश लोक खातात तितक्या रुचीनें ते लोक तें कच्चें मांस खात होते.

आगष्टमहिन्याच्या तिसऱ्या तारिखेस सफर करणारे बासष्टअंश आणि पंचवीस कळा इतक्या अक्षांशापर्यंत गेले; तेव्हां रेसोल्यूशन जहाजावरील शस्त्रवैद्य नामें अन्डरसन् साहेब हा मरण पावला; हा त्यांचा मोठा नाश झाला. त्या साहेबास एकावर्षाहून अधिक दिवसपर्यंत क्षयरोग लागला होता. त्यानंतर सुमारें आठादिवसांनीं कप्तान कूक ह्यानें एक्या जमीनीच्या टोंका खालीं जहाजें नांगरिलीं, त्या टोंकास त्यानें केप प्रिन्स आव् वेल्स असें नांव दिलें. आजपर्यंत अमेरिकाखंडाच्या पश्चिमबाजूचा जितका शोध लागला आहे तितक्यांत अतिपश्चिमेचें टोंक हेंच, ह्मणून हें विख्यात आहे. हें टोंक सिबीरिया देशच्या पूर्वभूवालाकेपासून केवळ एकुणचाळीस मैल दूर आहे. ह्याप्रकारें दोन महाद्वीपांच्या सांनिध्याचा निर्णय करण्याची कीर्ति कप्तान कूक ह्यानें

मिळविली. शेजारचे **एशियाटिक्** ह्मणजे एशियाखंडांत राहाणारेलोक, त्यांच्या लेखावरून व **रशिया** देशांतील नौकागमन कर्त्यांच्या अपुर्त्या चौकशीवरून, पूर्वी त्या सांनिध्याविषयीं तर्कमात्र करीत होते.

तेथून निघून तो समोरच्या एशियाचे कांठाकडेस गेला, आणि एक्या अखातांत जहाज नांगरिलें, त्यास त्यानें **सेंट लारेन्सूचें** अखात असें नांव दिलें; तें अखात **च्युसूकी** देशांत आहे. त्यानंतर पुनः अमेरिकेच्या कांठाकडेस येऊन तो उत्तरेकडेस चालिला; तेव्हां अठराव्या तारिखेस सत्तर अंश व चवेचाळीस कळा इतक्या अक्षांशांत तो जाऊन पोंचला; त्याकाळीं जहाजें बर्फाच्याकडेशीं जाऊन ठेपलीं, आणि त्यांस पुढें चालतां येईनासें झालें. तें बर्फ भिंतीप्रमाणें घट्ट व दहाबारा फूट उंच होतें असें अनुमान केलें. तेथून आणखी उत्तरेसतर तें अधिक उंच होतेंसें दिसलें. त्याचा पृष्ठभाग अगदीं खडबडीत व त्यावर जागोजाग पाण्याचीं डोबकणें दृष्टीस पडलीं. बर्फावर सामुद्रघोडे बहुत होते. आणि ताज्याखाण्याच्या जिनसांचा त्यावेळीं तोटा पडल्या मुळें त्यांपैकीं कितीएक घोडे खायाकरितां एकुणिसाव्या तारिखेस पैदा केले. ते खायास चांगले नव्हते, तथापि ते मरत तों पर्यंत सफरकरणाऱ्यांनीं त्यांवरच निर्वाह केला, आणि बहुतेक खलाशांस तर ते खाटिकेच्या मांसांपेक्षां बरें वाटलें.

**बेरिंगच्या** सामुद्रधुनीपलीकडे बर्फमय समुद्रांत असंख्य अडचणी व अडथळे भोगून चोंहीकडे **कपतान कूक** हा एकुणतिसाव्या तारिखपर्यंत भ्रमण करीत होता. दररोज बर्फ अधिकाधिक होऊं लागलें, तेणें करून त्या जलप्रवासाचा मुख्य उद्देश ह्मणजे उत्तरेकडून **अटलांटिक** समुद्रांत

जाण्याचा रस्ता शोधून काढणें, हें कार्य सिद्धीस जाण्याची आशा विशेषें करून चालते वर्षांत तर राहिलीच नाहीं. ती मोसमही इतकी होऊन गेली होती, आणि बर्फ जमायाचा काळ इतका जवळ येऊन ठेपला होता कीं, पुढील उन्हाळ्यापर्यंत आणखी पुढें प्रयत्न करणें ह्मणजे विचारास अगदीं विरुद्ध झालें असतें. ह्याजकरितां, दुसऱ्या अगत्याच्या कामाकडेस आतां कपूतानकूक ह्याचें लक्ष्य लागलें. जेथें पाणी व लांकूडफांटें मिळेल असें ठिकाण मिळविण्याची सफरीलोकांस फार आवश्यकता होती, परंतु, हिंवाळा अशारीतीनें घालविला पाहिजे कीं, त्यांत भूगोलविद्या, व नौकागमनशास्त्र ह्यांविषयीं कांहीं सुधारणूक करितां येईल, व पुढील उन्हाळ्यांत मार्गाचा अणखी शोध लावायास जाण्यासारखी स्थिति राहील ही योजना मुख्यत्वें करून त्यांच्या मनांत घोळत होती.

फार दक्षिणेस जाण्याच्या पूर्वीं कपूतानकूक ह्यानें बेरिंगच्या सामुद्रधुनीच्या जवळचे एशिया व अमेरिका ह्या दोहींच्या बाजूंचे कांठ व समुद्र ह्यांचा तपास करण्यांत बराच काळ घालविला, आणि अकटोबरच्या तिसऱ्या तारिखेस तो ऊनालाश्का बेटास परत आला. जहाजांची जरूरीची डागडोजी येथें प्रथम करून घ्यावी असा त्याचा बेत होता. त्याप्रमाणें त्या कामास पुढें लागलाच आरंभ केला. सफर करणाऱ्यांस येथें येऊन फार दिवस झाले नाहींत तों कपूतानकूक आणि कपूतानक्लार्क ह्यांस प्रत्येकीं रै नामक धान्याची एकेक रोटी नजर मिळाली; ती फार चमत्कारिक होती, कारण तिजमध्यें मिर्यांचा उत्तम मसाला लावलेले असे सालमन् जातीचें मांस घातलें होते, आणि प्रत्येक रोटीबरोबर एकेकाचिठ्ठी एक्या

भाषेंत लिहिली होती, ती कोणाएकासही वाचतां आली नाहीं त्या नजरा रशिया देशांतून आल्या असें अनुमान झाल्यावरून त्यांबद्दल गोडी, द्राक्षासव, आणि पोरटर नामक दारू, ह्यांच्या शिवाय कितीएक त्यांनीं आपल्या अज्ञात मित्रांस पाठविल्या. सफरकरणाऱ्यांपाशीं पाठवाया सारिख्या ज्या जिनसा होत्या त्यांमध्यें हे पदार्थ फार ग्राह्य आहेत असा त्यांनीं विचार केला तो योग्य होता. भेटी नेणाऱ्या बराबर एक हुशार इंग्लिश मनुष्य आणखी वर्तमान कळण्या करितां पाठविला, तो तीनदिवसांनीं परत आला, त्या बराबर तिघेजण एशिया देशाचे खलाशी आले होते. ते लोंकर जमा करण्या करितां येथें राहिले होते, आणि त्या बेटांत त्यांचें एक राहायाचें घर, व कांहीं वखारी, आणि सरासरी तीन टन ओझ्याचें लहानसें एक जहाज, असें होतें त्यांतून एकजण त्या जहाजाचा तांडेल होता. ते तिघेही समंजस व चांगल्या चालीचे होते असें दिसलें, परंतु कोणी दुभाष्या नव्हता त्यामुळें त्यांजबरोबर बोलायाची मोठी अडचण पडली. एक मोठा हुशार रशियन्नू (रशिया देशांत राहाणारा) चौदाव्या तारिखेस ऊनालाश्का बेटास आला. त्यापाशीं त्या समुद्राचा नकाशा लिहिलेला होता तो कपूतानकूक ह्यानें पाहिला; आणि त्याच्या अनुमोदनावरून त्याची नकल करून घेतली. ह्या गृहस्था बराबर इंग्लंडास पत्रें पाठवायाची त्यास संधी सांपडली. तीं पत्रें कामसूकाटका येथून स्थळमार्गानें पिटर्सबर्ग येथें जाऊन नंतर, जीं जहाजें वारंवार लंडन शहरास जात असत, त्यांतून एका जहाजा बराबर लंडनास गेलीं.

ऊनालाश्का येथें जहाजांचा मुक्काम होता, तों पर्यंत सफर करणाऱ्यांनीं त्या बेटांतील उत्पन्न व राहाणाऱ्यांच्या साधारण रीती भाती, ह्यांचा

गली चौकशी करण्याविषयीं हयगय केली नाहीं. ह्यागोष्टीविषयीं तेथें विस्तारें सांगण्याचें अगत्य नाहीं. परंतु तेथीललोकांस फार महत्वप्रद अशी एक गोष्ट आहे ती सांगितली पाहिजे, ती अशी, ते लोक पराकाष्ठेचे शांत व उपद्रव नकरणार होते, तसे कपूतान कूक त्यास कधीं कोणी भेटले नाहींत, आणि भलेपणाविषयीं तर, जे अतिसुधारलेले लोक आहेत त्यांनीं देखिल त्यांचा कित्ता घ्यावा.

निघायाची सर्वसिद्धता झाल्यावरून सविसावे तारिखेस कपूतान कूक ऊनालाश्का बेट सोडून स्यांडविचू बेटांकडेस चालता झाला, कांहीं, कांहीं महिने येथें काढून नंतर कामस्काटका ह्याचा रस्ता धरावा, असा कीं, येत्या उन्हाळ्यांत मेच्यामध्याचे सुमारास त्यादेशास पोंचण्यास ठीक पडेल, असें त्याचे मनांत होतें. स्यांडविचू बेटांत ओव्हीही ह्मणून एक बेट आहे तेथें नोवेंबरच्या तिसाव्या तारिखेस तो जाऊन पोंचला. ह्या पृथ्वी भागांतल्या नें जीं बेटें पाहिलीं त्यांपेक्षां हें बेट मोठें विस्तीर्ण व उपयोगी असें होतें. त्याबेटा भोंवतीं फिरून त्याच्या समुद्रकांठचा तपास करायाला त्यास सुमारें पावणे दोन महिने लागले. हें त्यांचें काम चाललें असतां तेथीललोक होड्यांतबसून वेळोवेळीं येऊन सफरकरणाऱ्यां बराबर विलंब नकरितां व्यापार करूं लागले. ह्या व्यापारांत त्यालोकांनीं शंका व संकोच अगदीं नधरितां वर्तणूक केली. ओटेहीट बेटांतील लोकां बराबर इंग्लिशांचा इतका पुष्कळ व पुनः पुनः संबंध घडला तथापि त्यांची चांगली वर्तणूक व भलेपणा ह्यांवर त्या लोकांचा देखिल ह्यांच्या सारिखा पूर्णविश्वास होता असें दिसलें नाहीं.

संन १७७९ साल जानेवारीच्या सोळाव्या तारिखेस, चोहींकडून येऊन

दोनही जहाजां भोंवतीं इतक्या होड्या मिळाल्या कीं, त्यांची संख्या एका हजारास कमती नव्हती. त्यांपैकीं बहुतेकांत माणसें होतीं, व डुकरें आणि तेथें उत्पन्न होणारे दुसरे पदार्थ ह्यांकडून त्या चांगल्या लादल्या होत्या. त्या लोकांतून एकापाशीं देखिल कोणतेंही तऱ्हेचें हत्यार नव्हतें, ह्यावरून त्यांच्या मनांत कांहीं विपरीतभाव नव्हता हें सिद्ध होऊन समाधान झालें. व्यापार आणि अपूर्वपदार्थ पाहाण्याची इच्छा, हाच त्यांचा मुख्य उद्देश होता असें दिसलें. आतां जहाजावर एवढा मोठा समुदाय वारंवार मिळत होता, त्यांत एखाद्या मनुष्याचा स्वभाव चोरटा आढळला तरी आश्चर्य आहे असा अर्थ नाहीं. रेसोल्यूशन जहाजावरून लव्यानावचें झकाणूं चोरून घेऊन एक मनुष्य इतका त्वरेनें पळाला कीं, तें पुनः हस्तगत झालें नाहीं. ज्या होडींत तें झकाणूं नेलें होतें तिजवर तीन चार बंदुका, व तितक्याच चार रतली तोफा मारायास कपूतान कूक ह्यानें हुकूम केला; परंतु सभोंवतीं तद्देशीयलोक जमा झाले होते त्यांस ते आवाज ऐकून भयापेक्षां आश्चर्यच फार वाटलें. त्यांतून कितीएक इंडियन लोकांनीं रात्रीं निजायास परमाणगी मागितली परंतु ही परमाणगी मागण्याचा हेतु मौज पाहाणें हाच केवळ नव्हता; कारण कितीएक जिनसा नाहींशा झाल्या असें दुसऱ्यादिवशीं सकाळीं समजण्यांत आलें ह्याजकरितां इतक्या असाम्यांस दुसऱ्या रात्रीं गलबतावर राहूं देऊं नये असा कपूतानकूक ह्यानें ठराव केला.

सत्राव्या तारिखेस जहाजें एक्या खाडींत नांगरिलीं, त्याखाडीस तद्देशीयलोक "काराकाकुवा" असें ह्मणत असत. कपूतानकूक

ह्यानें आपल्या जलप्रवासांत येथल्या प्रमाणें एका ठिकाणीं इतकेलोक ज-मलेले कधीं पाहिले नव्हते. कारण कीं, होड्यांत बसून बहुतलोक आले होते, व त्यां खेरीज सर्व खाडीचा कांठ तमासगिरांनीं भरला होता, व मा-शांच्या टोळी प्रमाणें सहस्त्रावधिलोक जहाजां भोंवतीं पोंहत होते. त्या लो-कांनीं इंग्लिशांचा फारच आदर सत्कार केला. ते आनंदानें गाऊं व ओ-रडूं लागले, आणि कळेल तसे अनेक हावभाव करूं लागले. जहाजांच्या मजल्यावर घोळका जमला होता त्यानें बहुत करून सर्वभाग वेढले होते, व इंग्लिशांपेक्षां त्यांची संख्या फार होती. त्यांमध्यें दोघे तिघे ना-ईक होते, त्यांनीं कपूतानकूक व त्या मोहिमीस आलेले दुसरे गृहस्थ ह्यांस कांठावर बोलाविलें. ते तेथें गेले तेव्हां फार विलक्षण समारंभानें त्यां-चीं भेट घेतली. त्या समारंभांत त्यालोकांनीं परमावधीचा सत्कार के-ला, इतका कीं, देवपूजेंत व त्यांत वास्तविक थोडेंच अंतर दिसून आलें. ह्यानंतर, कपूतानकूक ह्यास त्या बेटाच्या राजाकडेस नेलें, त्याचें नांव टे-रीओबू असें होतें. त्यानें पराकाष्ठेच्या ममतेनें व स्नेहभावानें त्याची भेट घेतली. सफर करणारे व तद्देशीयलोक ह्यांमध्यें जो व्यवहार चालला होता, त्यांत त्यालोकांनीं शांत व निरुपद्रविक अशी वर्तणूक केली, त्या मुळें संकटांत पडण्याचें कांहीं भय राहिलें नाहीं; ह्मणून इंग्लिश लो-क सर्वदा व सर्वठिकाणीं त्यालोकांमध्यें विश्वासानें राहूं लागले. इंग्लि-शांस त्यालोकांच्या मायाळूपणाचे व सभ्यपणाचे इतके बहुत दाखले अ-नुभवास आले कीं, त्याचें वर्णन सहज करितां यावयाचें नाहीं. त्यांत विशे-षें करून उपाध्यायाच्या मंडळीनें इतका उदारपणा व दातृत्व दाखविलें कीं,

तसा दाखला आजपर्यंत ऐकण्यांतही आला नाहीं. कारण कीं, मोबदला मागनें न मागतां, किंवा त्याविषयीं कांहीं न सूचवितां त्यांनीं सफरीलोकांस डुकरें आणि भाजीपाला हीं संतत पुरविली. परंतु त्यालोकांचें उदारपण व पाहुणचार ह्यांपासून जो संतोष झाला, त्यास त्यांतून पुष्कळांच्या चोरट्या स्वभावामुळें बहुतवेळां विघ्न झालें. आणि समयविशेषीं **कपूतानकूक** किंवा दुसरे कामदार ह्यांस निर्दय कामें करावीं लागत, तेणेंकरून अधिक दुःख होत असे. जर **इंग्लिशांस** निर्दय कामाशिवाय गत्यंतर असतें तर त्यांनीं तसलीं कामें करण्याचें टाळिलें असतें.

जरीं तद्देशीय लोकांनीं मायाळू व उदार वर्तणूक अखंड चालविली होती तरीं राजा व त्याचे सरदार हे शेवटीं सफरीलोकांचा कूच केव्हां होणार ह्याविषयीं फारच शोध करूं लागले. तथापि आपण सर्वदा मायाळूपणा व आदर सत्कार एतत्पूर्वक वर्तणूक केली, निजला योग्य असे नजर नजराणे देऊन **इंग्लिशांची** रवानगी करून देण्याची पुरती सिद्धता करावी, हीच **टेरीओबू** राजाची इच्छा होती. ह्याखेरीज तो शोध करण्यांत त्याचा दुसरा कांहीं मतलब नव्हता असें दिसून आलें. कारण ते एक दोन दिवसांनीं बेट सोडून जाणार असें त्यास कळलें, तेव्हां ते जाणार त्याचवेळीं त्यांस नजर करण्याकरितां डुकरें व भाजीपाला घेऊन यावें अशी लागलीच खेड्यांतून दवंडी दिली. त्याप्रमाणें, फेब्रुवारीच्या चौथ्या तारिखेस जहाजें हाकारायाचा ठराव झाला होता म्हणून, तिसऱ्या तारिखेस **टेरीओबू** राजानें **कपूतानकूक** व **किंगसाहेब** ह्यांस आपल्या भेटीस बोलाविलें. ते गेले तेव्हां, भुईवर कापडाचे ढीग पडले होते, व तेथून थोड्या अंत-

गावर पुष्कळ शाकभाजा, आणि त्यांजवळ डुकरांचा मोठा समुदाय होता असें त्यांनीं पाहिलें. भेटीच्या अखेरीस, त्या कापडाचा मोठा विभाग, आणि डुकरें व शाकभाज्या हें सर्व, टेरी ओबू राजानें कपूतानकूक व त्याचे कामदार त्यांस दिलें; तेव्हां त्या नजराण्याचें मोल व उमदेपणापाहून त्यांस आश्चर्य वाटलें, कारण फ्रेंन्डूली किंवा सोसैटी ह्या बेटांत त्यांनीं जे तसले पदार्थ पाहिले होते त्या सर्वांपेक्षां हे फार उत्कृष्ट होते.

दुसऱ्यादिवशीं प्रातःकाळीं काराकाकुवा त्या खाडींतून जहाजें हाकारिलीं, त्या काळीं टेरी ओबू त्यानें कपूतानकूक त्यास, डुकरें आणि शाकंभाज्यात्यांनीं मोल भेट पाठवून, त्याज बरोबर जो आपला स्नेह, त्याचा त्यानें नूतन दाखला दाखविला. ओहिही बेटाच्या पाहाणीचें काम जें त्यानें सुरू केलें होतें, तें संपवून मग इतर स्यांडूबिच् बेटांस जावें असा कपूतानकूक ह्याचा बेत होता. नुकती जी खाडी त्यानें सोडिली तिजपेक्षां जेथें वाऱ्यापासून चांगला बचाव होईल असें एखादें बंदर असेल तर तें शोधून काढावें, असा बेत करण्यांत त्याचा मतलब होता. पुढें दोन दिवसांनीं मोठें वावदक झालें, तेव्हां दुर्दैवेंकरून रेसोल्यूशन जहाजाची पुढील डोलकाठी हिला अशा भयंकर रीतानें इजा झाली कीं, त्यास काराकाकुवा येथें परत जाणें प्राप्त झालें. जहाजें परत आलीं तेव्हां कितीएक होड्या त्यांच्या जवळ आल्या, त्यांत सफरीलोकांचे पहिले वळखीचे बहुत होते. तिसऱ्या प्रहरीं, एक प्रथम पायरीचा सरदार राजाचा निकट संबंधी होता, तो डिस्कवरी जहाजावर गेला. त्याच्या आंगावर उंच परांची कफणी होती, ती तो विकाया करितां घेऊन आला होतासा दिसला; परंतु लोखंडी

ऱ्यांशिवाय दुसऱ्या कशा बद्दल तो नी देईना. तेव्हां त्याला तिज बद्दल नऊ ऱ्हरे दिले. आपली संभावना झाली त्या योगें संतुष्ट होऊन तो व त्याचे चाकर त्या रात्रीं जहाजावरच निजले.

त्यानंतर, रेसोल्यूशान जहाजाची पुढील डोलकाठी कांठावर नीट करावी ह्मणून तिला जमीनीवर नेण्याची तयारी केली; आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं कपूतानकूक त्याची भेट घेण्याकरितां राजा स्वतां रेसोल्यूशान जहाजावर गेला, तेव्हां त्याजबरावर बहुत चाकर मनुष्यें होतीं त्यांपैकीं कितीएकांपाशीं कपूतानकूका करितां आणलेला नजर नजराणा होता. ते दिवशीं ह्मणजे फेब्रुवारीच्या तेराव्या तारिखेस बहुत तद्देशीय लोक ही जहाजावर आले होते. रेसोल्यूशान जहाजाची पुढली डोलकाठी जमीनीवर नेली. आणि किनाऱ्यावर त्यांच्या पहिल्या ठिकाणीं तंबू उभे केले. त्या दिवशीं एक इंडियन मनुष्य शिकलकऱ्याचा सांडस लोहाराच्या कारखान्यांतून चोरून नेतांना धरिला. तेव्हां त्यास त्या कर्माकरितां कठिण फटके मारून जहाजा बाहेर काढून दिलें. अशी त्या मनुष्याची दशा केली ती पाहिली, तथापि तिसऱ्या प्रहरीं, दुसऱ्या एका मनुष्यानें धैर्यकरून त्याच ठिकाणांतून सांडस व किकरें, असें झोंबडून घेतलें, आणि त्या समयीं जहाजावरून उडी मारून तो किनाऱ्याकडेस पोंहत चालिला. तेव्हां तांडेल मिड्शिप्‌म्यानें त्यास जलद चालणाऱ्या लहान्या नावेंतून त्याच्या मागें तावडतोब पाठविलें. ते आपल्या

---

\+ आरमारांतील लेफ्टेनेंटच्या खालच्या पदवीचा कामदार

मागें लागले असें पाहून तो एक्या होडीकडे गेला, तेव्हां त्याच्या देशाचे लोक त्यास होडींत घेऊन त्यांच्यानें होईल तितकी त्वरा करून वल्हीं मारीत ते कांठाकडेस गेले. त्यांजवर कितीएक बंदुका मारल्या पण त्या व्यर्थ गेल्या कारण, ते गोळीच्या टप्प्यांतून लौकर पार झाले. कप्तानकूक त्यावेळीं कांठावर होता, त्यानें त्या चोराच्या उतरण्यास कितीएक आडवें होण्याचा यत्न केला, परंतु तद्देशीयलोक कप्तानकूक त्यानें सांगितलें नव्हतें तरी आपणच होऊन वाटाडे झाले होते. त्यांनीं त्यास ती वाट सोडून दुसरीकडेस नेलें.

तद्देशीय लोकांबराबर यांकडे येऊन जो मोठा घात झाला त्या गोष्टीचा आरंभ येथून झाला. रात्रीं, डिस्कवरी जहाजाच्या दिमतीची एक नाव त्या लोकांनीं पळवून नेली व त्यांच्या शत्रुभावाचीं चिन्हें आणिरवी पुष्कळ पाहाण्यांत आलीं. त्याजवरून, नाव आपल्या हस्तगत होऊन इंग्लिश व इंडियन त्या लोकांमध्यें पुनः स्नेहभाव चालू होण्यास उत्तम गुणावह उपाय ह्मटला ह्मणजे होईलनर येथील राजास अटकावून ठेवावें, हा होय, असा कप्तानकूक त्यानें निर्धार केला आणि जहाजावरील शिबंदीचा लेफ्टेनेंट, एक हवालदार, एक नाईक, व सात असामी घरगुती मनुष्य, ह्यांस बरोबर घेऊन, तसेंच जहाजांच्या दोन नावांत कितीएक मनुष्यांस हत्यारबंद करून तो निर्भयपणें राजाच्या राहायाच्या ठिकाणीं गेला. तेव्हां, पूर्वीं प्रमाणें इंडियन लोक त्याच्या भोंवतीं मिळाले आणि भुईवर दंडवत घालून त्यांनीं आपलीं नेहेमी प्रमाणें सत्काराचीं चिन्हें त्यास दाखविलीं. राजाची भेट झाली तेव्हां कप्तानकूक त्यानें स्नेहाचे

ऱ्या रीतीनें त्याचा हात धरून रेसोल्यूशन जहाजावर येण्यावि-षयीं त्यास ह्मटलें, त्यास तो लागलाच कबूल झाला. ह्यानंतर थो-ड्या वेळानें कितीएक इंडियन लोक लांब लांब बर्च्या, सोटे, आणि सुरे ही घेऊन हत्यारबंद होतांना व चिलखता प्रमाणें ते जाड चटया वापरीत असत, त्या आंगावर घालतांना आढळले. डिस्कवरी ज-हाजाच्या एका नावेंतल्या मनुष्यांनीं कारीमू ह्या नांवाचा एक ना-ईक ठार मारिला, अशी बातमी घेऊन दोन मनुष्य आले, त्यावरून हा शत्रुपणाचा देखाव वृद्धिंगत होऊन अधिक भयंकर झाला. आ-तां कपूतानकूक ह्याच्या भोंवतीं मोठा मेळा मिळून त्यास त्यांनीं वेढिलें होतें, त्यावरून आपली स्थिती कांहींशी भयंकर झाली असें त्यास वाटलें; ह्मणून जहाजावरील शिबंदी लोकांचा लेफ्टेनेंट ह्यास आपल्या लहानशा टोळीस, पाण्याच्या बाजूजवळ, किनाऱ्यापासून थोड्या यार्डोच्या आंत (यार्ड ह्मणजे वार) नावा होत्या, तिकडे कूच करविण्यास त्यानें हुकूम केला. त्यांस जाण्या करितां इंडियन लोकां-नीं लागलीच वाटकरून दिली आणि त्यांना कांहीं हरकत केली ना-हीं. त्यांस सरासरी पन्नास किंवा साठ यार्ड इतकें दूर जावयाचें होतें. त्यांच्या मागून कपूतानकूक हा टेरीओबू राजाचा हात धरून चा-लला. तो राजाही कपूतानकूका बराबर फार संतोषानें चालिला होता; त्याजसमागमें त्याची बायको, दोन मुलगे, आणि कितीएक नाईक अथवा सरदार होते. त्याचा धाकटा मुलगा ह्यास आपला बाप आप-ल्या मागून येईल असें वाटून तो लागलाच नावेंत गेला. परंतु राजा

पाण्याच्या बाजू जवळ येऊन पोंचतांच त्याच्या बायकोनें त्याच्या गळ्यांत मिठी घातली आणि दोघां नाइकांच्या मदतीनें त्यास एक्या दुहेरी होडीच्या बाजूवर बलात्कारानें बसविलें. तेव्हां कपुतानकूक ह्यानें त्यांस झडझडून सांगितलें पण व्यर्थ गेलें. ते त्या राजास पुढें जाऊं देईनांत व सांगूं लागले कीं, जर तूं त्या जहाजावर गेलास तर ठार मारला जाशील.

राजा अशा स्थितींत असतां, आणखी एक नाईक आपल्या कफणी खालीं कांहींसा झांकलेला असा एक लोखंडी सुरा घेऊन टपत बसलेला आढळला. त्याचा बेत, कपुतानकूक किंवा अरमारी लोकांचा लेफ्टेनेंट ह्यास भोसकावें, असा उघड दिसण्यांत आला. तेव्हां लेफ्टेनेंट ह्याच्या मनांत त्यावर बंदुक सोडायाची होती परंतु त्याविषयीं कप्तान कूक त्यास परमाणगी देईना. तो नाईक आंगाशीं आल्यावरून त्या कामदारानें त्यास आपल्या बंदुकीचा ठोंसा दिला. त्यामुळें त्यास मागें फिरावें लागलें. तेव्हां तो तंटा वाढूं लागला व इंडियन लोक हे अधिकाधिक धीट व साहसी होऊं लागले, असें पाहून त्याच्या बहुत लोकांच्या जीवाचा घात झाल्या शिवाय बळात्कारानें ह्या राजास घेऊन जाणें अशक्य आहे, असें कपुतानकूक ह्यास वाटलें. ह्याजकरितां तो किंचित् उगाच राहिला आणि आपण नावेंत बसून राजास परत जावयास हुकूम देणार. इतक्यांत एक्या मनुष्यानें त्याजवर एक धोंडा झोंकिला. त्यावर कपुतानकूक ह्यानें लहानशी गोळी घालून बंदूक मारिली; तेव्हां त्या मनुष्यानें आपली बरची परजून ती कप्तानकूक

ह्यावर झोंकावी, अशा लागांत तो होता, इतक्यांत कपुतान कूक ह्या-नें त्यास आपल्या बंदुकीच्या योगें खालीं पाडलें. त्या मेळ्यांत जे फार पुढारी होते त्यांस त्यांच्या दंगेखोर वर्तणुकीविषयीं बळकट कान उघ-डून सांगितलें, आणि आपल्या लहानशा टोळीवर किती एक हजार लोकां-चा घोळका अगदीं जवळ येऊन भिडला, ह्मणून ती टोळी सुरक्षितपणें नावेंत बसून जावी ह्याविषयीं मात्र तो आतां यत्न करूं लागला. दुहेरी होडीच्या मागून एक मनुष्य आपली बर्ची कपुतान कूक ह्याजवर टा-कतांना आढळला. ह्याजकरितां आत्म संरक्षणार्थ कपुतान कूक ह्यास त्याजवर बंदुक झाडावी लागली. परंतु तेणेंकरून दुसराच एक मनुष्य जो त्याजसारिखाच दंगा करण्यांत पुढारी असून कपुतान कूक ह्याच्याज-वळ होता तो मारला गेला. तेव्हां कपुतान कूक ह्याचें पहिल्या मनुष्या विषयींचें संधान चुकलें असें त्या हवलदारानें पाहून, त्यानें दुसऱ्यावर शिस्त धरिली व हुकूम मिळाल्यावरून त्यास गोळीनें ठार केलें. त्याका-ळीं इंडियन लोकांची धुमाळी कांहींशी दबली. त्यांचा घोळका मागें सरला आणि ते कचरलेसे दिसले, परंतु जे मागें होते त्यांनीं त्यांवर रेंट केला तेव्हां ते पुनः चालकरून आले, आणि जहाजांवरील शिबं-दीलोकांवर दगडांचा भडमार करूं लागले. तेव्हां ते शिपायीलोक हु-कुमाची वाट न पाहातां बंदुकांची एक सरबत्ती करून माघारें परतले. ती सरबत्ती झाल्यावर लागलेच नावांवरून बार होऊं लागले; तेव्हां कपुतान कूक ह्यानें नावेंतील लोकांचें बार करणें बंदकरून शिपायीलो-कांस आंत घेण्याकरितां जवळ यावें असें हाताच्या खुणांनीं सांगितलें.

त्या काळीं एका नावेंतील कामदारानें, आपल्या लोकांवर दगडांची दृष्टि होत असतांही आपली नाव लागलीच जितकी कांठाजवळ आणवेल तितकी आणिली; परंतु दुसऱ्या नावेंत लेफ्टेनेंट होता त्यानें कप्तान कूक याच्या मदतीस येण्याचें सोडून, ज्या समयीं सर्व गोष्टी नावांतील मनुष्यांच्या समयोचित प्रयत्नाधीन होत्या त्याच समयीं आपली नाव आणखी दूर नेली. तो त्या खुणेचा अर्थ उलटा समजला. तें जसें असेल तसें असो, परंतु त्या गोष्टीच्या योगानें भयंकर परिणाम झाला, व कप्तान कूक यास आपला जीव बचाविण्याचा उपाय राहिला नाहीं. जहाजा वरील शिबंदीलोकांनीं त्या टोळीवर बहुतवेळां बार केले. परंतु ते व्यर्थ झाले. कारण, इंडियन लोकांनीं त्यांच्या मध्यें घुसून त्यांस पाण्यांत हलवून लाविलें; तेथें त्यांतून चार असामी ठार मारले गेले. यावेळीं इंग्लिश लोकां पैकीं एक कप्तान कूक मात्र कांठावर उरला होता, त्याजवर दगडांचा मार चालला होता. ते दगड डोक्यास न लागावे ह्मणून त्या मागें आपला डावा हात धरून उजवे काखेंत बंदुक घेऊन तो होडीकडेस जात आहे असें पाहून, एक इंडियन त्याच्या मागें सावधगिरीनें व भीतभीत असा चालिला, आणि जसा कांहीं पुढें जाण्याचा आपला बेत नाहीं, असें दाखवून तो एकदोन वेळ उभा राहिला. शेवटीं त्यानें एका एकीं कप्तानकूकावर तुटून पडून, एक्या मोठ्या सोट्यानें त्याच्या डोक्याच्या मागीलबाजूवर एक टोला मारिला; आणि लागलाच सत्वर माघारा पळून गेला. इकडे सोट्याच्या तडाख्यानें कप्तानकूक याची शुद्धि गेली; व कितीएक पावलें कलथ्यारवात

जाऊन शेवटीं तो आपला हात व गुडघा त्यांवर पडला, व त्याची बंदुक ही गळून पडली. पुढें तो उठून आपले पाय सांवरीत आहे इतक्यांत, दुसऱ्या एका इंडियन मनुष्यानें येऊन त्याच्या मानेच्या मागल्या आंगास लोखंडाच्या सुरीनें भोसकलें, तेव्हां तो सरासरी गुडघ्या इतक्या खोल पाण्यांत पडला. त्यासमयीं दुसरे इंडियन त्याच्यावर गोळा होऊन त्यास खालींच दाबून धरण्याविषयीं यत्न करूं लागले; परंतु त्यांबरावर बळानें झत्यापत्या करून त्यानें आपलें डोकें वर काढिलें, आणि आपल्या नावेकडे पाहून तो मदत मागत आहे असा दिसला. परंतु त्याजपासून नाव नऊ दाहा हातांवर होती तरी खलाशीलोकांची घालमेल होऊन ते घाबरून गेले होते, त्यामुळें त्यांचा बचाव करण्याची त्यांस शक्ति राहिली नव्हती असें वाटतें. इंडियन लोकांनीं पुनः त्यास पहिल्यापेक्षां खोल पाण्यांत नेऊन खालीं दडपलें, तथापि आणखी एकदां त्यानें आपलें डोकें बळानें वरतीं काढिलें. आणि झोंबी करण्यांत तो अगदीं खरचला गेला त्यामुळें आपोआप एक्या खडकाकडेस वळून त्याचा आश्रय करूं लागला. इतक्यांत एका रानटी मनुष्यानें त्यास एक सोट्याचा तडाखा दिला तेव्हां कपुतान कूक हा गतप्राण झाला. इंडियन लोकांनीं त्यास वर ओढून खडकावर आणिलें आणि तेथें त्याच्या कलेवराशीं करवेल तितका क्रूरपणा करून त्यांनीं जंगली मौज मांडिली. त्यांच्या रानटी क्रोधास जो बळी झाला, त्यास भयकारक संतोषानें टोंचण्याकरितां ते एकमेकांच्या हातांतून सुऱ्या हिसकून घेऊं

लागले. ह्याप्रकारें त्यांनी सूड घेतल्यावर ते त्यास विजयसमारंभानें घेऊन गेले. इकडे कपुतान क्लार्क ह्यास आतां त्या मोहिमेचा मुख्य अधिकार प्राप्त झाला. त्यानें कपुतान कूक ह्याचें प्रेत हस्तगत करण्याविषयीं बहुत यत्न केला, परंतु त्याच्या अस्थिमात्र मिळाल्या त्या, ज्यांनीं त्याच्या संगतीं चाकरी केली होती, त्या सर्वांनी मोठ्या हृदय स्फोटक शोकें करून समुद्रामध्यें टाकिल्या.

कृष्णाचार्य —, ह्या उपयोगी पुरुषाच्या मरणामुळें, बहुत करून मनुष्यमात्राचा तोटा झाला, आणि विशेषेंकरून जे लोक उपयोगी गुणांच्या मनुष्यास मान देतात, व विद्वानाची प्रतिष्ठा करितात, आणि परोपकारी व प्रीत अशा अंतःकरणाच्या मनुष्यावर प्रीति करितात, त्यासर्वांस दुःख होईल असें जें ह्मटलें आहे तें यथार्थ आहे. ज्यालोकांच्या शत्रुत्वामुळें तो मारला गेला त्यालोकांपासून तशी गोष्ट होण्याचें भय होतें खरेंच, पण तो त्यास योग्य नव्हता हा विचार मनांत आला ह्मणजे ह्या मोठ्या नाशापासून झालेलें दुःख द्विगुणित होतें. कारण कीं, तो बहुतकरून इंडियन लोकांविषयीं पराकाष्ठेची मनःपूर्वक काळजी व माया करीत असे व ममतेनें वर्तणूक करून त्याची भीति दवडण्यास व मैत्री करून घेण्यास फार मेहेनत करीत असे. त्यांच्या चोऱ्या व दगलबाजी ह्यांजकडेस दुर्लक्ष्य करीत असे, व आपल्या लोकांस उपद्रव झाल्यामुळें, त्यांस एकाएकीं क्रोध चढला असतां त्यांपासून त्याचें संरक्षण करण्याकरितां आपल्या जीवाकडे देखिल नपाहातां तो वारंवार मध्यें आडवा येत असे.

रामचंद्र —, खरेंच महाराज, त्याची परोपकार बुद्धि व दयाशीलता ह्यांचें स्मरण फारदिवस ज्यास राहूंनये असा पृथ्वीचा एकही कोंपरा नाहीं, मग तो फार दूर व तेथीललोक रानटी असले तरी चिंता नाहीं. पासिफिक् महा सागरांतील बहुतबेटांत राहाणारे जे कृतज्ञ इंडियन लोक ते आपल्या सुपीक मैदानांत चरणारेजे कळप त्यांजकडेस बोट दाखवून, हीं जनावरें मुळारंभीं येथें कशीं आलीं, ही गोष्ट पुढें आपल्या लेंकरांस सांगतील, व "कूक" ह्यानांवाचा सन्मान ते फार दिवस राखितील.

रखमाबाई —, कप्तानकूक ह्यास चांगली मदत मिळाली नाहीं ह्मणूनच केवळ तो मारला गेला हें मनांत आलें ह्मणजे वास्तविक दुःख होतें. आपल्या हाता खालच्या सर्वलोकांची काळजी ठेवण्याविषयीं जो इतका विख्यात, आणि ज्यानें आपल्या खलांच्या रक्षणाकडेस जितकें लक्ष्य दिलें, तितकें मरण पर्यंत त्यांच्या रक्षणाकडेस दिलें, त्या पुरुषाची आणि अशी अवस्था, ही फार शोकास्पद गोष्ट होय असें मला वाटतें.

आनंदराव —, ओहीही बेटांतील लोकांच्या हातून हें शोककारककर्म घडलें ह्यांत त्यांचा फारसा अन्याय नाहीं, असें मला वाटतें. कारण, त्यांनीं त्या कर्माविषयीं कांहीं पूर्वीं मसलत केली होती असें दिसत नाहीं, आणि इंग्लिशां बरोबर त्यांनीं मुद्दाम कज्जा शोधून काढिला असें ही नाहीं. तो प्रसंग इंग्लिशां प्रमाणेंच पूर्वी त्या लोकांच्याही अगदीं ध्यानीं मनीं नव्हता. ह्या सर्व गोष्टीस कारण चोरी

करणें, त्याविषयीं तर ते इंग्लिशांचे पहिल्या आणि दुसऱ्या भेटीस सारखेच अपराधी होते. असो जें घडलें तें सर्व गैरसमजुती मुळें घडलें. त्यांच्या क्षुल्लक चोऱ्यांकडे बहुत करून लक्ष्य दिलें नाहीं, क्वचित् दिलें तेव्हां शिक्षा हलकीच केली; शेवटीं त्यांनीं धैर्यकरून एक नाव चोरून नेली, ती इंग्लिशांस त्या प्रसंगीं मोठीच नुकसानाची गोष्ट होती, कां कीं, त्यांस तसली दुसरी नाव मिळणें अशक्य होतें. ह्याजकरितां ती गोष्ट सहज दुर्लक्ष्य करण्यासारखी क्षुल्लक नव्हती. राजास कैद करण्या खेरीज ती हस्तगत होण्याचा दुसरा उपाय नव्हता. ह्मणून त्यास कैद करण्याचा यत्न चालविला असतां त्याच्या संरक्षणाविषयीं ते लोक घाबरे झाले, आणि जे आपले शत्रु असें त्यांस वाटलें त्यांना ते स्वभावेंकरून आडवे झाले. तेव्हां एकाएकीं तंटा उत्पन्न होऊन त्यांत पूर्वी सांगितल्या रीतीनें इंग्लिश लोकांच्या परम दुर्दैवेंकरून त्यांचा सरदार पडला. ह्या प्रमाणें तें वृत्त घडलें असें माझ्या बुद्धीस येतें. ही गोष्ट केवळ निष्कारण झाली, व पूर्वीं त्या लोकांस कांहीं उपद्रव पोंचला होता त्यामुळें, अथवा त्यांच्या मनांत वैरभाव उत्पन्न झाला होता असें कोणाचें मत आहे, त्या वैरभावामुळें अशी गोष्ट घडली असा अगदीं अर्थ नाहीं.

यमुना —, कपूतान कूक मरण पावल्यावर त्या स्वारीचा मुख्य अधिकार कोणास मिळाला बरें?

आनंदराव —, डिस्कवरी जहाजाचा सरदार कपूतान क्लार्क,

हा त्याच्या खालच्या पदवीचा होता तेव्हां अर्थात त्यास तो अधिकार मिळाला ह्मणून तो आतां रेसोल्यूशन जहाजावर गेला, आणि डिस्कवरी जहाजाचा अधिकार त्यानें गोर साहेबास दिला.

**रामचंद्र** —, ह्या शोककारक जलाटनाच्या अखेरीस ज्या गोष्टी घडल्या त्यांचा संक्षिप्त वृत्तांत म्या तयार केला आहे तो संध्याकाळीं उठल्याच्या पूर्वी वाचायास आज्ञा असली तर मी वाचीन.

**कृष्णाचार्य** —, मी ही कप्तान कूक ह्याचा स्वभाव, बुद्धि, आणि वर्तणूक ह्यांविषयीं थोडेसें बोलतों.

त्याची चाल निष्कपट, साधी, आणि प्रौढ, अशी होती. तिजमध्यें उत्तम भर्तृत्व, पितृत्व, आणि अकृत्रिम व दृढ असें मित्रत्व हे गुण होते. त्याचा स्वभाव फार परोपकारी व दयाळू होता, हें सर्व जलप्रवासांत त्यानें आपल्या लोकां बरोबर जी वर्तणूक केली तिजवरून व त्यानें शोधून काढिलेल्या सर्व देशांतील लोकांशीं तो ज्या रीतीनें चालला तिजवरून स्पष्ट ध्यानांत येतें. हाताखालच्या लोकांचें आरोग्य, सोय, आणि त्यांस होईल तितका सुखोपभोग ह्यांकडेस निरंतर त्याचें लक्ष्य होतें, व अनेक बेटें व ठिकाणें त्यानें पाहिलीं तेथील लोकांच्या स्थितीची सुधारणूक करण्याविषयीं तो नेहमी उत्सुक होता, त्यांच्या चोऱ्यांचे अपराध तो मोकळे मनानें क्षमा करीत होता, आणि ज्याकरितां इतरांनीं शिक्षाच केली असती, तसल्या बहुत अन्यायांकडेस त्यानें अलक्ष्य केलें, आणि एखादे तीक्ष्णतेचें कर्म करायानें अगत्य पडलें असतांही त्यानें तें मनापासून व निर्दयपणानें कधींच केलें नाहीं.

त्याचें बुद्धिवैभव फार उपयोगी जातीचें होतें, ही गोष्ट निर्विवाद

आहे. त्याचें अंतःकरण फारविस्तीर्ण व सूक्ष्म होतें, व त्याप्रमाणें त्याचे सर्व बेत धैर्याचे व विस्तृत होते. हे बेत ठरले ह्मणजे त्यांच्या सिद्धीविषयीं त्यास कधीं संशय आला नाहीं. ज्या असंदिग्ध व व्यवस्थित विचारांच्या योगें तो जे बेत ठरवीत असे त्याच विचारांच्या बळानें ते बेत पारपाडण्याविषयींची फार सोपी व गुणावह अशी युक्ति काढण्यास तो समर्थ होता. आपलीं कामें पारपाडण्याविषयींही तो तसाच विख्यात होता. कोणत्याही अवघड गोष्टीमुळें तो गोंधळांत पडला नाहीं, व कोणत्याही संकटांत तो भय पावला नाहीं. त्याची बुद्धि व ज्ञान हीं गरजेच्या वेळेस सर्वदा केवळ त्याच्या स्वाधीन असत. मोठाल्या कामाविषयीं तो शरीर बळानें ही योग्य होता. त्यास मेहेनत करायाची संवई पडून गेली होती, त्यामुळें अतिशय श्रम व कष्ट भोगण्याचें त्यास सामर्थ्य होतें. नौकागमन विद्येचें त्यास पूर्णज्ञान असून दुसऱ्याही विद्येंत त्याचा परिचय होता. ह्याविषयीं फार थोड्या अभ्यासामुळें ज्या गोष्टी प्रतिकूळ होत्या त्या त्याच्या अंतःकरणाच्या उत्साहामुळें दूर झाल्या होत्या. गणिताच्या भिन्न भिन्न शाखा व विशेषें करून ज्योतिषविद्या, त्यांमध्यें त्याचा इतका चांगला अभ्यास झाला होता कीं, जलप्रवास करीत असतां गलबतावर त्या विद्येसंबंधीं जरूरीचें काम मुख्यत्वें करायास तो समर्थ होता. तसेंच साधारणविद्या व ग्रंथरचना ह्यांमध्यें तो इतका प्रवीण झाला होता कीं, प्रौढ, सुबोध, व शुद्ध अशा रीतीनें लिहायाचें त्यास सामर्थ्य येऊन, स्वतां मोठालीं कृत्यें करून त्यांचें वर्णनही लिहून ठेव-

णारा, अशी कीर्ति मिळविण्याजोगा तो झाला.

रामचंद्र —, दीर्घप्रयत्न हा एक त्याच्या स्वभावांत विलक्षण गुण होता. त्याच्या योगें, त्यानें ज्या उदारकामांत जन्म घालविला तीं कामें पूर्ण केलीं. त्या दीर्घप्रयत्नाविषयीं त्याची बराबरी क्वचित् एखाद्यानें केली असेलपण त्याहून अधिक कधीं कोणी झाला नाहीं. ज्या कार्याकडेस त्याचें लक्ष्य लागलें त्यापासून कशाच्यानेंही तें विमुख झालें नाहीं. व ज्या अडचणीच्या व विघ्नांच्या योगें मोठ्या समर्थ व दृढ अशा हृदयाच्या पुरुषांसही मागें सरावें लागलें असतें त्या अडचणी आणि विघ्नें हीं सोसूनही तो कार्यकरणें निग्रहानें चालवीत असे.

यमुना —, कपूतानकूक त्याच्या शरीराचें वर्णन कसें केलें आहे?

आनंदराव —, साधारण आकृतीपेक्षां त्याचें शरीर कांहींसें उंच होतें, व जरी तो देखणा होता तरीं बोलण्यांत व डौलांत साधाच होता. त्याचें डोकें लहान होतें, व केंस पिंगट होते, ते तो मागें बांधीत असे, त्याचें मुख हृद्गत सूचक होतें; नाकाची आकृति फार उत्कृष्ट होती, त्याचे डोळे लहान उदीरंगाचे छायेचे, चंचळ व तीक्ष्ण असे होते. व भिवया उंच होत्या. त्या योगानें त्याचा चेहरा अगदीं करडा दिसत होता.

रखमाबाई —, कपूतानकूक यानें जीं कामें बजाविलीं, त्यांच्या योगानें प्राचीन आणि नवीन अशा सर्वनौकागमनकर्त्यांपेक्षां ह्याचा नांवलौकिक फार झाला.

कृष्णाचार्य —, होय बाई, त्याच्या देशांतच केवळ त्याच्या नांवास

पराकाष्ठेचा मान देनात असें नाहीं, तर इतर सर्वदेशांतही देतात, व कितीएक परदेशीय लोकांनीं अनेक प्रकारचे आदरसन्मान त्याच्या स्मरणार्थ केले आहेत.

यमुना —, पतित्व, आणि पितृत्व हे धर्म त्याच्यांत उत्कृष्ट होते, असें **कृष्णाचार्य** बोलिले; तेव्हां त्याच्या कुटुंबांत कोण कोण माणसें होतीं बरें? तो मरण पावल्यावर त्यांस कांहीं नेमणूक करून दिली असेल असें मला वाटतें.

कृष्णाचार्य —, **बाट्स्** ह्मणून एक सुंदर व योग्य स्त्री होती, तिजबरोबर त्यानें संन १७७२ रांत लग्न केलें. तिच्या पोटीं त्यास साहा लेंकरें झालीं, परंतु त्यांपैकीं तिघे मुलगे मात्र त्याच्या मागें राहिले. त्या सर्वांस नाविक कर्म शिकविलें होतें. तिघांतून एकजण, तुफान झालें होतें त्यांत गमावला, व बाकी दोघेजण स्वदेशाच्या कामांत महत्वानें मरण पावले. **कप्तानकूक** वारल्यावर त्याची स्त्री जीवंत होती तों पर्यंत तिला वर्षास दोन हजार रुपये व प्रत्येक मुलास सालीना अडीचशें रुपये ह्या प्रमाणें **ब्रिटिश** सरकारानें नेमणूक करून दिली.

रामचंद्र —. पण महाराज, त्या थोर नौकागमन कर्त्यानें जीं कामें केलीं त्यांपासून त्यांस कायतो इतकाच फायदा झाला असें नाहीं. **पासिफिक्** महासागरांतील पर्यटन छापून प्रसिद्ध करते समयीं जे नकाशे व पत्रे लागले, त्यांचा खर्च सरकारानें दिला. व तो ग्रंथ विकला तेव्हां त्यापासून बहुत नफा झाला, त्यापैकीं अर्धा ऐवज **कूकसाहेबाची** बायको जीवंत आहे तों पर्यंत तिनें त्याचा उपयोग करावा, व ती मरण पाव-

त्यावर तिच्या लेंकरांनी तो वांटून घ्यावा ह्मणून सावकारींत लावून ठेविला होता.

आनंदराव —, कूक साहेबाच्या मरणाची दुःखकारक गोष्ट सांगून रामचंद्रानें मागील कथा संपविली. आतां तो प्रकार घडल्या नंतर जहाजें इंग्लंड देशास परत गेलीं तेव्हां ज्या गोष्टी घडल्या त्यांचा सारांश तुह्मांजवळ वाचून दाखवीन ह्मणून रामचंद्र बोलला होता, तर तो तेवढा वांचला, ह्मणजे आजचें संभाषण आपण पुरे करूं.

ह्यावरून रामचंद्रानें खालीं लिहिल्या प्रमाणें वाचिलें.

कपूतान कूक ह्याच्या मरणानंतर ज्या गोष्टी घडल्या त्यांची गोष्ट.

कपूतान क्लार्क ह्यास त्या मोहिमीचा मुख्य अधिकार प्राप्त होऊन तो त्या घातक ओहीही बेटास सोडून निघाल्यावर, कूक साहेबानें नवीन शोध करायाचे जे बेत करून ठेविले होते, ते पार पाडण्याचा उद्योग करणें हा आपला धर्म होय असा त्यानें विचार केला. त्याप्रमाणें तो स्यांडविच् बेटां पैकीं दुसऱ्या कितीएक बेटांच्या कांठाकांठानें फिरला, आणि सन १७७९ तील मार्चाच्या पंधराव्या तारिखेस सरत्या शेवटीं तो तीं सोडून निघाला. आतां तीं जहाजें कामस्काट्का देशाकडेस चालिलीं, तेव्हां मार्गांत रेसोल्यूशन जहाजास इतका बाईट पाझर लागला कीं, एकेक मजल्यांच्या मधली सर्व जागा पाण्यांत बु-

डून गेली. बर्फानें व्याप्त असे कामस्काट्का येथील पर्वत नेवि-साव्या तारिखेस दिसूं लागले. आतां हवा इतकी तीक्ष्ण होती कीं, जहाज अगदीं बर्फाच्या गोळ्याप्रमाणें दिसूं लागलें. आणि जहाजाच्या दोरखंडावर इतका लेप चढला होता कीं, निरनिराळे दोर नेहेमीपेक्षां दुप्पट जाड झाले होते.

कामस्काट्का देशाचा शोध लागल्यावर दोन दिवसांनीं अवाट्स्का नामक अखाताच्या तोंडापलीकडे असतां रेसोल्यूशन जहाजास डिस्कवरी जहाज दिसेनासें झालें. रेसोल्यूशन जहाज त्या अखातांत शिरल्यानंतर लौकरच पित्रोपोलोस्की ह्मणून गांव आहे तो दिसूं लागला. त्या गांवांत थोडकीं लांकडी घरें, व कांब्यावर उभ्या केलेल्या शंक्वाकृति झोंपड्या, मिळून एकंदर तीस होतीं. तथापि तेथील लोकांनीं सफर करणाऱ्यांचा आदर सत्कार करून त्यांजबरोबर दयाळूपणा, थोर अंतःकरण, व श्रेष्ठ विचार, एतत्पूर्वक वर्तणूक केली. तशी कोणत्याही देशाच्या लोकांनीं केली असती तर तिच्यायोगें त्यांस थोरपणाच प्राप्त झाला असता. मे महिन्याच्या पहिल्या तारिखेस डिस्कवरी जहाजही त्या बंदरांत येऊन दाखल झालें.

समुद्रकांठ्याच्या ज्या भागाजवळ जहाजें नांगरिलीं होतीं तेथून, खाण्याचे पदार्थ मिळण्याची अगदीं सोय नव्हती; परंतु त्याजकरितां कामस्काट्का येथील सुभेदारास अर्ज केल्यावरून त्यानें त्यांचा पुरावा फारच घोताळीनें केला.

जूलेच्या पांचव्या तारिखेस सफर करणारे बेरिंगच्या सामुद्र

धुनींतून गेले; अडसष्ट व एकुणहत्तर ह्या अक्षांशांच्या मधील समुद्र शोधावा ह्मणून पहिल्यानें एशिया खंडाच्या कांठानेंच चालून नंतर ते अमेरिका खंडाच्या कांठाकडेस वळले, परंतु त्या कामांत त्यांचा यत्न सफळ झाला नाहीं. जमीनीशीं संबद्ध असें बर्फाचें घट्ट व मोठें मैदान त्यांस सातव्या तारिखेस लागलें त्यामुळें पुढें जाण्यास त्यांना प्रतिबंध झाला. नवव्या तारिखेस ते त्या बर्फाच्या कांठाकांठानेंच पश्चिमेकडेस एक मैलपर्यंत गेले परंतु खांच खोबळा कांहींच दृष्टीस पडला नाहीं ह्मणून आणखी उत्तरेस जाण्याची आशा राहिली नाहीं. तथापि सत्ताविसाव्या तारिखेपर्यंत, प्रथम अमेरिकेच्या बाजूस आणि नंतर एशिया खंडाच्या बाजूस, अशा रीतीनें ते मार्ग शोधीत होते. परंतु सत्तर अंश व तेहतीस कळा ह्यांहून पुढें उत्तरेस जाववलें नाहीं. मागल्या वेळेस ते ज्या ठिकाणीं गेले होते, तें ठिकाण येथून पंधरा मैल पुढें होतें.

एका समयीं वायव्य दिशेकडेस नेटून जाण्याचा यत्न करीत असतां डिस्कवरी जहाज मोठ्या संकटांत सांपडलें. मोठाल्या बर्फाच्या कितीएक तुकड्यांत तें इतकें गुंतलें कीं, त्याची गति खुंटून त्यास बरीच इजा पोंचली. तथापि दुपारावर वाऱ्याचा फेरफार झाल्यावरून बर्फ निरनिराळें होऊं लागलें, तेव्हां सफरीलोकांनीं सर्व शिडें उभारून त्यां मधून जोरानें रस्ता काढिला.

आणखी पुढें उत्तरेस जाणें, तसेंच एशिया व अमेरिका ह्या दोन महाद्वीपांतून एकाच्या तरीं आणखी जवळ जाणें, त्यास

बर्फमय समुद्राच्या योगें प्रतिबंध झाला आहे असें जाणून असाध्य कामांत इतःपर काळ घालवूं नये, असा कपूतानक्लार्क यानें निश्चय केला. जहाजांस जी नुकसानी पोंचली होती ती नीट करून नंतर जापानद्वीपाच्या कांठाचा शोध लावून, तेथून युरोपास जावें असा त्यानें बेत केला. ही गोष्ट समजल्यावरून, दोनही जहाजांवरील खलाशी लोकांस पुढें लांब जलप्रवास आझून करायाचा होता. तरीं त्यांस इतका हर्ष व समाधान झालें कीं, ल्यांडज्‌ ऐन्‌ड (इंग्लंडाच्या दक्षिणेस टोंक आहे) यापासून दृष्टीच्या टप्यांतच जाणों आपण आलों असें त्यांस वाटलें.

एकतिसाव्या तारिखेस त्यांनीं पुनः बेरिंगची सामुद्रधुनी वोलांडिली. यावेळीं कपूतान क्लार्क याची शरीरप्रकृति सत्वर क्षीण होत चालली, तेव्हां आगष्ट महिन्याच्या सत्राव्या तारिखेस त्यास बिछान्यावरून उठवेनासें झालें आणि पुढें पांचा दिवसांनीं क्षयरोगानें तो मरण पावला. हा रोग त्यास इंग्लंडाहून निघाल्या पूर्वींच लागून तेणेंकरून तो सर्व प्रवास भर झिजणीस लागला होता. आतां त्या मोहिमीचा मुख्य अधिकार कपूतान गोर याजकडेस आला, तेव्हां तो रेसोल्यूशान जहाजावर गेला, आणि त्यानें किंगसाहेब हा डिस्कवरी जहाजाचा मुख्य केला. एकुणतिसाव्या तारिखेस रविवारीं कपूतानक्लार्क याचें प्रेत सफरकरणाऱ्यांनीं सर्व समारंभ व सन्मान करून पित्रोपोलोस्की नामक गांवाजवळ पुरलें. ज्या जागीं तें पुरलें ती जागा एका झाडाखालीं त्या बंदराच्याउत्तरेच्या

बाजूस होती; व त्या जागेवर एक नवें देऊळ बांधायाची योजना झाली होती असें त्यांच्या समजण्यांत आलें.

सफरी लोकांनीं दोन्ही जहाजांची मरामत पुरतेपणीं केली, व, सरंजाम, पाणी, आणि खाण्याचे पदार्थ, ह्यांचा आणखी सांठा करून घेतला, नंतर करिलीं बेटांच्या आंगानें जाऊन जापानचे बेटांच्या पूर्व कांमाच्या तपास करून मग इंग्लंडास जावें अशा बेतानें ते कामस्काट्का येथून निघाले. अकटोबरच्या बाराव्या तारिखेस त्यांस कामस्काट्का देश दिसेनासा झाला. एकामागून एक अशीं लगत वादळें झालीं त्यांमुळें ते धरलेल्या रस्त्याचे अगदीं बाहेर लोटत गेले, ह्यास्तव करिलीं बेटांचा तपास करण्याचा बेत होता तो सिद्धीस गेला नाहीं. सव्वीसाव्या तारिखेस, अरुणोदयीं, गलबतांच्या पश्चिमेकडेस उंच जमीन त्यांच्या दृष्टीस पडली. तें जापान द्वीप, किंवा त्याच्याजवळील बेटांच्या समुदायांतील एखादें बेट, असेल; परंतु उलटा वारा व समोरले ओघ ह्यामुळें त्याच्या जवळ जाववेना ह्मणून कप्तान गोर ह्यानें हिंवाळा जवळ आला ह्याजकरितां तावडतोब चीन देशास जावें असा बेत केला.

नोवेंबरच्या एकुणतिसाव्या तारिखेस जहाजांस चीनी लोकांच्या मासे धरण्याच्या कितीएक नावा भेटल्या व फुटलेल्या नावांकडून तो समुद्र आच्छादित झाला होता. मागें जें वादळ झालें होतें त्या वेळेस त्या फुटल्या असें सफरीलोकांनीं अनुमान केलें. ह्यावेळीं ते बावीस अंश व एक कळा इतक्या दक्षिण अक्षांशांत होते दुसऱ्या दिवशीं ते लीमा बेटां-

ऱ्या जवळून गेले, तेव्हां त्यांनीं एक चिनी सुकाणूवाला जहाजा-वर घेतला आणि डिसेंबर महिन्याच्या पहिल्या तारिखेस स-काळचे नऊ वाजतां मकाऊ पासून नऊ मैलांच्या अंतरावर जा-ऊन त्यांनीं जहाजें नांगरिलीं. खाण्याचे जिन्नस व सरंजाम पैदा करण्या करितां कपुतान किंग ह्यास क्यांटन् एथें पाठविलें. त्या-नें सत्तिसाव्या तारिखे पर्यंत खरेदी करण्याचें काम आटोपून ते सर्व जिन्नस दुसऱ्यादिवशीं जहाजांवर पाठवून दिले. सफरीलोकां-नीं कामस्काट्का येथून विशेषेंकरून पाणमांजरांची लोंकर बहुत आणिली होती, ती चीनी लोकांस विकली, तिच्यायोगें वीसहजा-रांस फार्गे कमी नाहींत इतके रुपये उत्पन्न झाले, चिनीलोकांब-राबर जी देव घेव झाली तिजमुळें खलाशी लोकांच्या पोषाखांत फारच लष्करदारीचा फेरफार झाला. मकाऊजवळ जेव्हां ते आ-ले, तेव्हां धाकटे कामदार व खलाशी लोक त्यांचें स्वरूप केवळ चिं-ध्यांचें झालें होतें. कारण कीं, त्यांच्याजवळचीं बहुतकरून सर्व प-हिलीं युरोपांतील वस्त्रें फार दिवस वापरल्यामुळें जीर्ण झालीं हो-तीं, व त्यांस कानड्याचीं, किंवा देशांचा शोध करीत असतां मिळा-लेलीं कापडं त्यांची, थिगळें दिलीं होतीं, त्यांस आतां चीन देशांती-ल उत्कृष्ट रेशीम आणि कापूस ह्यांची भेळ करून पुरवणी ला-विली होती.

अमेरिकन् लोकांबराबर, व अमेरिकन् लोकांचे पक्ष पाती ह्मणून फ्रेंच व स्पानियार्ड ह्यालोकांबरोबरही इंग्लिश

लोकांची लढाई चालली आहे असें वर्तमान सफरीलोकांस क्यां टन बंदरांत समजल्यावरून त्यांच्यानें करवेल तितका त्यांनीं आपल्या रक्षणाचा उत्तम बंदोबस्त केला, तो असा; रेसोल्यूशान जहाजावर सोळा व डिस्कवरी जहाजावर दाहा अशा तोफा उंच ठिकाणीं मांडिल्या, परंतु आपल्या शत्रूंच्या औदार्यावरून ह्या बंदोबस्ताची कांहीं गरज नाहीं असें मानायास त्यांस प्रमाण मिळालें; त्यांच्या समजण्यांत आलें कीं, युरोप खंडांत फ्रेंच लोकांचीं जीं लढाऊ जहाजें पकडलीं त्यांत, कप्तान कूक ह्याच्या हुकमती खालचीं जहाजें भेटल्यास त्यांना उपद्रव नकरितां जाऊं द्यावीं, अशी त्यांजवरील मालिमांस ताकीदपत्रें होतीं तीं सांपडलीं; ह्याप्रमाणेंच अमेरिका येथील राज्य चालविणाऱ्या मंडळीनें आपल्या चाकरींतील जहाजांवर हुकुम पाठविले आहेत, असेंही त्यांस समजलें. ह्या औदार्याच्या देणगीची फेड करण्याकरितां, शत्रूंचीं जहाजें धरण्याची संधी आली असतां तीं नधरितां, बाकी राहिलेला जलप्रवास संपेपर्यंत ते स्वपरपक्ष सोडून अगदीं तिऱ्हाईतपणें राहिले.

संन १७८० तील ज्यानेवारीच्या बाराव्या तारिखेस, सफरी लोक मकाऊ येथून निघाले; एकूणिसाव्या तारिखेस त्यांनीं प्यूलोसपेटा बेट पाहिलें; व विसाव्या तारिखेस प्यूलोकानूडोर बेट दृष्टीस पडलें, तेव्हां त्याच्या आग्नेयी दिशेचा शेवटाकडील बंदरांत जाऊन त्यांनीं जहाजें नांगरिलीं. येथें आठ टोणगे व दुसरे

खायाचे पदार्थ त्यांनीं पैदा केले. प्यूलोकानूडोर येथें ज्यानेवारीच्या अठ्ठाविसाव्या तारिखे पर्यंत मुकाम करून तेथून ब्यांका व सनूडा ह्या सामुद्रधुन्यांच्या मधील रस्त्यानें ते स्वदेशाकडेस चालते झाले. इतक्यांत कांहीं वर्णनीय गोष्ट घडली नाहीं. ब्यांका सामुद्रधुनींत शिरल्यापासून त्या मारक हवेचे गुण त्यांच्या फार अनुभवास येऊं लागले. खलाशीलोकांमध्यें दुष्ट संनिपातज्वर व कठीण खोकला आणि आमातिसार ह्यांचा सपाटा चालू झाला, परंतु दैवयोगानें कोणाएकाच्याही जीवाचा घात झाला नाहीं.

फेब्रुवारीच्या अठराव्या तारिखेस ते सनूडाची सामुद्रधुनी सोडून निघाले. पंचविसावी व सव्विसावी ह्या तारिखांच्या मधील रात्रीं एक मोठें तुफान झालें, त्या वेळीं जीं शिडें त्यांनीं बांकविलीं होतीं तीं बहुतकरून सर्व फाटून चिंधज्या झाल्या; तेव्हां दुसऱ्या दिवशीं, आपलीं सरत्या शेवटचीं शिडें बांकविणें, व सर्व चव्हाटें सरलीं होतीं ह्मणून जहाजांच्या दोरखंडास गांठी देऊन त्यांची सांधासांध करणें; हें त्यांस प्राप्त झालें.

एप्रिलच्या सातव्या तारिखेस, अफ्रिका खंडाची भूमी त्यांच्या दृष्टीस पडली, बाराव्या तारिखेस संध्याकाळीं फाल्स् नामक अखातांत त्यांनीं नांगर टाकिला, आणि दुसऱ्यादिवशीं सकाळीं, केप् आफ्गुड्होप् येथें सिमन्च्या अखातांत ते स्थिर झाले.

खायाचे पदार्थ, आणि गलबतांसंबंधी जरूरीचा सरंजाम, घे-

ऊन सफरकरणारे मेच्या नवव्या तारिखेस त्या आरमानांतून चालते झाले. ज्यूनच्या बाराव्या तारिखेस त्यांनी ह्या जलप्रवासांत मध्यरेषा चौथ्यानें वोलांडिली. आगष्टच्या बाराव्या तारिखेस ते ऐर्लंडाच्या पश्चिमतीराजवळ गेले; तेव्हां पोर्टगाल्वे येथें जाण्याविषयीं श्रम केला, पण तो निष्फळ होऊन, दक्षिणेकडील जोरदार वाऱ्यामुळें त्यांस उत्तरेकडेस जाणें प्राप्त झालें. आणि आगष्टच्या सव्विसाव्या तारिखेस दोनही जहाजें अर्कनी बेटांतील स्त्राम्नेस् ठिकाणाजवळ आलीं, तेव्हां त्यांचे नांगर टाकिले. तेथून कपूतान गोर ह्यानें आपलें येण्याचें वर्तमान बोर्डआवूअड्मिरल्टी (अरमाराचा कारभार पाहाणारी मंडळी) त्यांस जाहीर करावें ह्मणून कपूतान किंग ह्यास ताबडतोब पाठविलें. अकटोबरच्या पहिल्या तारिखेस जहाजें नोर येथें सलामतपणें येऊन पोंचलीं. तेव्हां त्यांस जाऊन चारवर्षे दोन महिने आणि बावीस दिवस झाले होते.

आनंदराव —, आजसकाळीं मला पत्रें आलीं त्यांवरून थोडे दिवस पर्यंत मला बाहेर गांवीं जाण्याची जरूरी दिसते. आपल्या दुसऱ्या संभाषणांची माळा आतां संपूर्ण झाली; आणि थोडे दिवस मीं गैरहजीर असल्यामुळें आपल्या कामांत कांहीं विशेष हरकत होईल असें नाहीं. एक प्रकारें तर येणेंकरून वास्तविक उपयोगच होईल; कां कीं, जे नामांकित देशाटन करणारे झाले त्यांजविषयीं नूतन संभाषणाचाक्रम चालवायाचा आहे, त्याजकरितां सिद्धता करायास राम-

चंद्र व गोपाळा ह्यांस मी गैर हजीर आहें तंव फुरसत मिळेल.

गोपाळ—, महाराज, देशाटन करणाऱ्यांचे वृत्तांताचें कथन कराव्यास आरंभ करण्यापूर्वी, कपूतान कूक ह्याच्या वेळापासून आज दिवस पर्यंत जे जलाटन करणारे झाले त्यांजविषयींच संभाषणें चालविणं हें बरें पडणार नाहीं?

आनंदराव—, तें बरें पडणार नाहीं ह्याविषयीं, गोपाळा, दोन कारणें आहेत, प्रथम, मला असें वाटतें कीं, देशाटन करणारे व जलाटन करणारे ह्यांचे लेख, परस्पर संबंध न ठेवतां निरनिराळे वाचावे त्यापेक्षां एककालींच वाचले असतां तुमचें ज्ञान अधिक विस्तीर्ण होऊन तुमची बुद्धि अधिक सुधरेल. दुसरें कपूतान कूक ह्याच्या नंतर जे पुरुष झाले त्यांच्या वृत्तांताचें ज्ञान तुह्मांस मिळणें अशक्य आहे.

रामचंद्र—, कपूतान कूक ह्याचा वृत्तांत सांगितला त्याच्या पूर्वील दोन तीन गोष्टींत देखिल आपण मागें चुकलों, कारण, कप्तान जेम्स, कपूतान राजर्स, कपूतान वालिस आणि कपूतान कार्टरेट् ह्यांचा वृत्तांत आपणांस कांहींच मिळाला नाहीं आणि जर आपण गुण दोष वर्णन करूं लागतों तर अर्थात आपणांस अधिक अडचण पडती.

कृष्णाचार्य—, प्रस्तुत देशाटन करणाऱ्यांचे वृत्तांत तुह्मी चालवावे हें बरें, असा जो आनंदरावजीचा अभिप्राय, तो मला सर्वथा मान्य आहे. हल्लीं नुकते आपण वृत्तांत समाप्त केले, त्यांस जितका काळ लाग-

ला तितकाच काळ हे वृत्तांत समाप्त करायास तुह्माला लागेल. ते संप ल्यानंतर माझ्या मनांत आणखी एक विचार आला आहे तो मी तुह्मांस सविस्तर सांगेन.

